


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

ISSN 2456-656X

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

जुलै ते सप्टेंबर २०१९

लोकमान्य टिळक स्मृतिशताब्दी । ग.दि. माडगूळकर जन्मशताब्दी

लोकशाहीर अण्णाभाऊ साठे जन्मशताब्दी

डॉ. सरोजिनी बाबर जन्मशताब्दी

विनम्र अभिवादन









अनुक्रमणिका







महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या राजेंद्र बनहट्टी गौरव व्याख्यानमालेत विधानपरिषदेच्या उपसभापती आणि लेखिका डॉ. नीलम गोऱ्हे यांची स्त्री आणि समाजकारण व स्त्री आणि राजकारण या दोन विषयांवर व्याख्याने आयोजित करण्यात आली.



महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने डॉ.म.वि. गोखले पुरस्कृत ह.भ.प.कै. सोनोपंत दांडेकर स्मृती पुरस्कार डॉ. श्रीपाद जोशी (इंदोर) आणि कुमुद भट पुरस्कृत रवींद्र भट पुरस्कार संतसाहित्यातील लक्षणीय योगदानाबद्दल मोहनबुवा रामदासी यांना डॉ.अभय टिळक यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला.



महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, लोकरंग सांस्कृतिक मंच ठाणे, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ आणि राष्ट्रसेवा प्रतिष्ठान बावधन पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने लोकसाहित्याच्या ज्येष्ठ संशोधक डॉ. सरोजिनी बाबर यांच्या जन्मशताब्दीनिमित्त आयोजित लोकसाहित्य संमेलन रविवार दि. १ सप्टेंबर २०१९ रोजी डॉ. अरुणा ढेरे यांच्या अध्यक्षतेखाली पुण्यात संपन्न झाले.




अंक क्र. ३६७, जुलै-सप्टेंबर २०१९



संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**



संपादन समिती

**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी । डॉ. भास्कर ढोके**
**डॉ. रणधीर शिंदे । डॉ. वर्षा तोडमल**



प्रकाशक

**प्रकाश पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)




◆

मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

◆

जाहिरात व्यवस्थापक
**वि. दा. पिंगळे**
९८८१२३५०३३

◆

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

◆

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

◆

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

◆

मुद्रितशोधन
**आरती देवगांवकर**

◆

मुद्रणस्थळ
**एस.ए. प्रिंटर्स, एल.एल.पी.**
फ्लॅट नं.५, ३रा मजला,
सिद्धीविनायक अपा.,
शिवदर्शन, पुणे ४११००९.

◆

मूल्य : १५ रुपये

◆

प्रकाशन क्र. ३६७
जुलै - सप्टेंबर २०१९

◆



# अं | त | रं | ग





अनुक्रमणिका








संपादकीय

डॉ. पुरुषोत्तम काळे

# मराठीच्या न्याय्यहक्कासाठी एकत्र येऊन संघर्ष करायला हवा!



सा. पत्रिकेच्या गेल्या अंकाच्या संपादकीयाच्या अखेरीस २४ जून रोजी होणाऱ्या मराठी भाषेसंदर्भातील आंदोलनास आम्ही शुभेच्छा दिल्या होत्या. या आंदोलनात महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पदाधिकाऱ्यांनी, सदस्यांनी सक्रिय सहभाग नोंदवून आंदोलन यशस्वी होण्यासाठी प्रयत्न केले. पुण्याहून आंदोलकांसाठी बसची व्यवस्था परिषदेने केली. महाराष्ट्रातील मराठीप्रेमी संस्था आणि कार्यकर्त्यांनी आझाद मैदान, मुंबई येथे उपस्थित राहून मराठी भाषेचे विविध प्रश्न धसास लागावे यासाठी आंदोलनास पाठिंबा दिला. मा. मुख्यमंत्र्यांनी आंदोलनाची दखल घेऊन आंदोलकांच्या शिष्टमंडळाबरोबर चर्चा करून विविध प्रश्नांवर सकारात्मक निर्णय घेण्याचे संकेत दिले. त्यानंतर सरकारने या प्रश्नांच्या सोडवणूकीसाठी एक सल्लागार समिती गठित केली. या समितीमध्ये अ. भा. साहित्य संमेलनाच्या अध्यक्षा अरुणा ढेरे आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे किंवा कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांचा समावेश केला गेला नाही. वस्तुतः साहित्यसंमेलनाध्यक्ष या महाराष्ट्रातील मराठी सारस्वतांचे प्रतिनिधित्व करतात आणि महाराष्ट्र साहित्य परिषद ही आद्य साहित्यसंस्था असून अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे आणि कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी परिषदेचे नेतृत्व करतात. या दोघांचाही समावेश या समितीत केला गेला नाही हे उचित झाले नाही. मराठी भाषेचा अभिजात दर्जा आणि इतर प्रश्नांविषयी महाराष्ट्र साहित्य परिषदेने वेळोवेळी आवाज उठविला आहे. बैठका घेतल्या आहेत. शासनस्तरावर मुख्यमंत्री आणि इतर मंत्री यांच्यासमवेत या प्रश्नांची चर्चा केली आहे. असे असताना म.सा. परिषद आणि संमेलनाध्यक्षांना वगळण्याचा संकुचितपणा या आंदोलनाच्या नेत्यांनी दाखवला हे खेदजनक आहे. मराठी भाषेच्या उत्कर्षासाठी सर्वांनी मानपान बाजूला ठेवून एकत्र आले पाहिजे. म.सा. परिषदेचा हा विचार असल्याने यापुढेही महाराष्ट्र साहित्य परिषद विविध आंदोलनात सहभागी असेल. ही चूक दुरुस्त करावी आणि शासनाने मा. अरुणा ढेरे, डॉ. रावसाहेब कसबे आणि प्रा. मिलिंद जोशी यांचा समावेश वरील समितीत करावा.

सांगली-सोलापूर भागात अतिवृष्टीने आलेल्या महापुरात अनेक लोकांचे प्राण गेले. मोठ्या प्रमाणावर वित्तहानी झाली. ग्रंथालये उद्ध्वस्त झाली. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकर्त्यांनी या ग्रंथालयांना ग्रंथ देण्यासाठी ग्रंथदान करण्याचे आवाहन जनतेला केले. त्याला प्रतिसाद देऊन आजवर









अनुक्रमणिका

६००० ग्रंथ परिषदेकडे जमा झाले आहेत. हे ग्रंथ लवकरच जिल्हा प्रतिनिधींमार्फत पूरग्रस्त भागातील ग्रंथालयांना पाठविण्यात येतील. सिंहगड रोड परिसरातील, स्नेहल जोशी यांनी परिषदेवर विश्वास दाखवत ४५०० ग्रंथांचे ग्रंथालय परिषदेला दिले. पिंपरी-चिंचवड म.सा.प.चे अध्यक्ष राजन लाखे यांनी पुरग्रस्त जनतेसाठी दोन टेंपो भरून जीवनावश्यक साहित्य पाठविले. मा. स्नेहल जोशी आणि मा. राजन लाखे हे त्यांच्या या कामाबद्दल प्रशंसेस पात्र आहेत.

मराठी भाषेऐवजी इंग्रजी भाषा अनिवार्य करण्याचा बृहन्मुंबई महानगरपालिकेचा निर्णय हा मराठीची गळचेपी करणारा आहे. खाजगी इंग्रजी शाळांकडे जाणारा विद्यार्थ्यांचा लोंढा पुन्हा महानगरपालिकेच्या शाळांकडे वळविण्याच्या प्रयत्नांत मराठीकडे दुर्लक्ष करण्याचा हा कट आहे. मुंबईतून मराठी माणसाचा टक्का घसरतोय. आता मराठी भाषाही हद्दपार करण्याचा हा प्रयत्न यशस्वी होऊ देता कामा नये. अभिजात भाषेच्या दर्जाबाबत नुसतीच आश्वासने देण्यात येतात. कार्यवाही होत नाही. सरकारकडे या मागण्यांचा प्रभावीपणे पाठपुरावा सर्वांनी करायला हवा. त्यासाठी सातत्यपूर्ण प्रयत्न करायला हवेत. प्रसंगी मातृभाषेसाठी प्रखर आंदोलन उभारण्याची तयारी ठेवली पाहिजे. मराठी भाषेच्या अभिजात दर्जासाठी सर्वांनी मिळून राज्यकर्त्यांवर दबाव आणला पाहिजे.

हे वर्ष लोकमान्य टिळकांचे स्मृतिशताब्दी वर्ष आहे. त्याचप्रमाणे प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख, डॉ. सरोजिनी बाबर आणि अण्णाभाऊ साठे यांचे जन्मशताब्दी वर्ष आहे. या थोरांचे स्मरण करताना त्यांच्या कर्तृत्वाविषयीचे लेख पत्रिकेत प्रकाशित करावे या हेतूने प्रा. सरदेशमुख आणि डॉ. बाबर यांच्यावरील डॉ. मेधा सिधये आणि डॉ. विश्वनाथ शिंदे यांचे लेख या अंकात प्रकाशित करीत आहोत. लोकमान्य टिळक आणि अण्णाभाऊ साठे यांच्यावरील लेख आगामी अंकात प्रकाशित करू.

दलित पँथरचे संस्थापक आणि आंबेडकरवादी चळवळीला आपल्या प्रखर विचारांनी दिशा देणारे राजा ढाले यांचे नुकतेच निधन झाले. साहित्य, समीक्षेविषयीची सूक्ष्म जाण, सामाजिक वास्तवाचे भेदक विश्लेषण करण्याची क्षमता आणि प्रस्थापित व्यवस्थेला हादरे देण्याचा बेडरपणा राजा ढाले यांच्या ठिकाणी होता. आपल्या विचारांच्यावर असलेली अव्यभिचारी निष्ठा आणि विचारप्रतिपादनार्थ वाटेल ते मोल देण्याची आणि प्रखर संघर्ष करण्याची तयारी राजा ढालेंची असे. दलित साहित्याची समीक्षा आणि दलित साहित्याचे सौंदर्यशास्त्र केवळ ढालेंमुळेच उभे राहू शकले.

'सात सक्कं त्रेचाळीस'सारखी मराठी साहित्यविश्वात मैलाचा दगड मानली जाणारी कादंबरी लिहिणारे किरण नगरकर यांचेही नुकतेच निधन झाले. एकच कादंबरी मराठीमध्ये लिहून इंग्रजीमध्ये लिहिलेल्या 'ककल्ड', 'रावण अ‍ॅण्ड एडी', 'जसोदा', 'रेस्ट इन पीस' आणि 'बेड टाईम स्टोरी' या सारख्या कादंबऱ्या आणि नाटकांमुळे नगरकर रसिक वाचकांना परिचित आहेत. साहित्य अकादमी आणि जर्मनीचा सर्वोच्च सन्मान 'ऑर्डर ऑफ मेरिट' हा सन्मान मिळालेले नगरकर, लोकसत्ताकारांच्या मताप्रमाणे मराठीला झेपले नाहीत हेच खरे! राजा ढाले आणि किरण नगरकर यांना विनम्र आदरांजली!

कवी सुशीलकुमार शिंदे यांना युवा साहित्य अकादमी पुरस्कार देण्यात आला. पुरस्काराची सर्व रक्कम त्यांनी पूरग्रस्तांच्या मदतीसाठी मुख्यमंत्री निधीला दिली आणि दातृत्वाचा आदर्श वस्तुपाठ घालून दिला मा. सुशीलकुमार शिंदे यांचे हार्दिक अभिनंदन!

सरोजिनी बाबर यांच्या जन्मशताब्दीप्रीत्यर्थ पुण्यात झालेल्या लोकसाहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणातून डॉ. अरुणा ढेरे यांनी मांडलेले विचार लोकसाहित्याच्या अभ्यासकांना दिशादर्शक ठरतील. १९व्या शतकातील मराठी साहित्य समीक्षेविषयीचा डॉ. प्रभाकर देसाई यांचा लेख, अनुराधा पाटील यांच्या 'कदाचित अजूनही' या काव्यसंग्रहावरील परीक्षण, प्रा. मिलिंद जोशी यांच्या 'खेळ' या कथासंग्रहावरील डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचा लेख, डॉ. सुधाकर शेलार यांच्या पुस्तकावरील 'नवसंशोधकांचा वाटाड्या' हा डॉ. संजय नगरकर यांचा लेख आणि वाचन प्रक्रियेची तांत्रिक बाजू मांडणारा डॉ. नवनाथ तुपे यांचा लेख, ही या अंकाची वैशिष्ट्ये आहेत.

सर्व सभासदांना आणि वाचकांना येणाऱ्या दीपावलीच्या शुभेच्छा!

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाईल अ‍ॅपवरही उपलब्ध आहे.)













लेख

प्रा. विश्वनाथ शिंदे

# जडित्राचं लेणं ल्यायलेल्या भाग्यवती अक्का : डॉ. सरोजिनी बाबर

**लोकसाहित्याच्या ज्येष्ठ अभ्यासक डॉ. सरोजिनी बाबर यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने प्रा. विश्वनाथ शिंदे यांनी लिहिलेला लेख.**



अहमदपूरच्या म. गांधी महाविद्यालयाने आयोजित केलेल्या लोकसाहित्य परिषदेत मी पहिल्यांदा डॉ. सरोजिनी बाबर यांना पाहिले, त्यानंतर शिवाजी विद्यापीठाच्या मराठी विभागात त्या व्याख्यानासाठी आल्या असता त्यांच्याशी माझी चांगली ओळख झाली. सळाळत्या उत्साहात वावरणाऱ्या, अत्यंत आपुलकीच्या लाघवी भाषेत बोलणाऱ्या, मृदू मनाच्या अक्कांच्या व्यक्तिमत्त्वाचा अनुभव मी घेतला. त्या लोकजीवनाशी इतक्या समरस झालेल्या होत्या की, त्यांच्या ओघवत्या वाणीतून लोकपरंपरेचा झरा खळाळून ओसंडून वाहत असे. त्यांच्या कथा-कादंबऱ्यांतून, कविता नि ललित लेखनातून आत्मपर विवेचनांतूनही लोकजीवन आणि लोकसंस्कृतीचा विविधांगी आविष्कार झालेला दिसतो. त्यांनी जीवनभर लोकसाहित्यविषयक सामग्रीचे अत्यंत निष्ठेने आणि व्रतस्थपणे विपुल संकलन केले. ते आजही लोकसाहित्याच्या नवनव्या अभ्यासकांना प्रेरणादायी व दिशादर्शक ठरणारे आहे. लोकहिताचे समाजकारण आणि मूल्यात्मक राजकारण अशी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची आणखी काही गुणवैशिष्ट्ये होती.

डॉ. सरोजिनी बाबर यांना समाजकारणाचा वसा त्यांच्या वडिलांकडून - कृष्णराव बाबर यांच्याकडून लाभला होता. ते ध्येयनिष्ठ शिक्षक होते. प्रौढ साक्षरांसाठी त्यांनी १९५० पासून 'समाज शिक्षण माला' सुरू करून ज्ञानदानाचे कार्य सुरू ठेवले होते. ९ जून १९७४ रोजी त्यांचे देहावसान झाले आणि समाजशिक्षण मालेची जबाबदारी अक्कांच्या अंगावर पडली. ती त्यांनी आयुष्याच्या अखेरपर्यंत निभावली. डॉ. सरोजिनी बाबर राजकारणात वडिलांच्या आग्रहामुळे आल्या. यशवंतराव चव्हाण आणि वसंतदादा पाटील यांच्याशी बाबर घराण्याचे नातेसंबंध होते. यशवंतराव चव्हाण तर सरोजिनी बाबर यांना 'अक्का' असेच संबोधत. त्यामुळे या थोर नेत्यांच्या सान्निध्यात राजकारणातील बारकावे अक्कांनी आत्मसात केले आणि मूल्यात्मक राजकारण त्या सतत करीत राहिल्या.

लोकसाहित्य-लोकसंस्कृतीचा वारसा अक्कांना त्यांच्या आजी आणि आई गंगूबाई यांच्याकडून मिळाला. मातुलगृहाचा वाटा त्यात अधिक होता. ''मामाच्या पैस वाड्याच्या अंगणात काटकीनं धुळाक्षर गिरवण्यात, फुटक्या बांगड्यांच्या काचांना दिव्यावर तापवून घेत वळवून आकार देतांना, भिंतीवरील झाडे सजवण्यात, आणखीन उकटलेल्या जात्यातील पिठाचे ठिपके काढीत ते





अनुक्रमणिका



**डॉ. सरोजिनी बाबर यांना मराठी संस्कृती, परंपरा यांचा अभिमान वाटत होता. संस्कारशील जीवनपद्धती, मूल्यव्यवस्था चालीरीती, बोली याविषयीची ओढ त्यांना होती. त्यामुळे लोकसाहित्यविषयक सामग्रींचे विवरणही त्यांनी याच भूमिकेतून केले आहे. त्यांचा पिंड चिकित्सक संशोधकाचा नसून आस्वादक भारावलेल्या भक्ताचा आहे. अर्थात त्यामुळे त्यांच्या कामाचे मोल तसूभरही कमी होत नाही. मराठी लोकजीवनाचे अत्यंत व्यापक दृष्टीने केलेले हे संकलन अभ्यासकांच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे आहे. या साऱ्या ग्रंथसंभारातून अनेक पी.एच.डी. प्रबंध लिहून होतील इतका महत्त्वाचा ऐवज डॉ. सरोजिनी बाबर यांनी अभ्यासकांकडे सुपूर्द केला आहे. एक अभिनव स्वरूपाचा लोकसाहित्याचा शब्दकोश त्यांनी संपादित केला असून तो मराठीतील एकमेव लोकसाहित्य शब्दकोश आहे.**

रेघांनी जुळवून रांगोळ्या काढण्यात माझा हात सरावलेला रहायचा.'' अशा शब्दांत स्वतः डॉ. सरोजिनी बाबर यांनी सांगितलेल्या बालवयातील आठवणी ऐकल्या की, नकळत्या वयापासूनच त्यांच्या मनात लोकसंस्कृतीच्या आकर्षणाची बीजे रुजत चालली होती असे आपल्या लक्षात येते.

डॉ. सरोजिनी बाबर यांचे मूळ घराणे सातारा जिल्ह्यातील 'चाफळ' या गावचे. त्या गावची देशमुखी बाबरांकडे होती; पण सरोजिनी बाबर यांचे पणजोबा लक्ष्मण बाबर सांगली जिल्ह्याच्या वाळवा तालुक्यातील बागणी या छोट्या गावचे रहिवाशी झाले. येथेच कृष्णराव बाबर लहानाचे मोठे झाले, त्यांनी शिक्षकी पेशा अंगीकारला. याच गावात १९२०मध्ये सरोजिनी बाबर यांचा जन्म झाला, त्यांचे प्राथमिक शिक्षणही बागणीतच झाले. माध्यमिक शिक्षणासाठी त्या सातारा येथे गेल्या. तेथे कर्मवीर भाऊराव पाटील यांच्या सहवासात त्या राहिल्या. पुढे कृष्णराव बाबर यांची पुण्याला बदली झाली. त्यामुळे सारे कुटुंब पुण्यात आले. सरोजिनी बाबर यांचे महाविद्यालयीन शिक्षण सर परशुराम भाऊ महाविद्यालयात झाले. १९४५ साली त्या मराठी विषय घेऊन बी. ए. झाल्या. मुंबई विद्यापीठात मराठी विषयात त्या सर्वप्रथम आल्या होत्या. याच विषयात एम. ए. झाल्यानंतर डॉ. के. ना. वाटवे यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी पी.एच.डी. पदवी संपादित केली.

आपल्या घरातील वातावरणासंबंधी डॉ. सरोजिनी बाबर एका ठिकाणी लिहितात, ''तसं पाहिलं, तर शेतीवाडीच्या रामरगाड्यातलं आमचं घ्रर. आमच्यासारखंच सादंभादं. तीन खण तिघई तोलाचं, नक्षिदार कवलाच्या छपराचं, चंद्रमौळी. तिथं वडिलधाऱ्यांचा वावर. वाडवडिलांची चालरीत, मुलाबाळांची वर्दळ. आल्यागेल्याची उठबस. लेकीसुनांची हौसमौज. सणासुदीचे कुळाचार. गुराढोराची उपसाभर. कावडीचं पाणी, दुधदुभत्याची चंगळ. करणीधरणीतला मानपान. मर्जीमाप वागणं-बोलणं. एकमेकांवद्दलच्या जिव्हाळ्याचा चिरेबंदी वाड्यागत बंदोबस्त. आगत्याची रेलचेल, बाळबोध वळण. असेल त्यात त्यात भागवून घ्यावं न् नसेल त्याची तक्रार मांडू नये अशी शिकवण. धनधान्यातल्या उतरंडीचा पसारा. पिढ्यान्‌पिढ्यांनी सांभाळलेल्या देवदेवताच्या पूजाआर्चा.'' अशा पारंपरिक, घरंदाज, मर्यादाशील, सुखवस्तू आणि सांस्कृतिक मूल्यव्यवस्था असणाऱ्या घरातील वातावरणात शरदिनी आणि कुमुदिनी या दोन धाकट्या बहिणींच्यासह सरोजिनीचे बालपण सुखात गेले. जवाहर नावाचा एक भाऊ होता; पण त्याचे लहान वयातच दुःखद निधन झाले. कृष्णराव बाबर मात्र पुढारलेल्या विचारांचे असल्याने त्यांनी आपल्या तिन्ही मुलींना उत्तम शिक्षण दिले. सरोजिनी पहिलेच अपत्य, लहानपणीच तिला पोलिओ झाल्याने त्या पायाने अधू झाल्या. म्हणून त्यांच्या वाट्याला अधिक प्रेम मिळाले. त्या काळात मराठ्याच्या मुलींनी शिक्षणासाठी किंवा अन्य कोण्या गोष्टींसाठी घराबाहेर पडावे ही सामान्य रीत नव्हती; पण कृष्णराव बाबर यांनी धाडसाने आपल्या मुलींना सर्व प्रकारची मोकळीक दिली होती. त्याचा विधायक फायदा घेऊन डॉ. सरोजिनी बाबर यांनी स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास केला.

कृष्णराव बाबर यांच्या 'समाज शिक्षण माले'चा पुण्यात चांगलाच बोलबाला होता. त्यात प्रौढांसाठी लिहिलेला मजकूर असायचा. त्यातून अनेक नामवंत लेखक लिहीत असत. खेड्यापाड्यातूनही समाज शिक्षण मालेचे अंक वाचले जायचे. कथाकार दौंडकर, रा. ल. ठोकळ, र. वा.

दिघे, वि. द. घाटे, के. नारायण काळे, अनंत काणेकर, प्र. के. अत्रे, कवी गिरीश, राजकवी यशवंत अशा अनेक मान्यवरांशी कृष्णराव बाबर यांचा संपर्क होता, त्यांची बाबरांच्या घरी सतत उठवस असे. या साऱ्या मान्यवरांच्यात होणारी चर्चा, त्यांच्या वाङ्मयीन चर्चा सरोजिनी बाबर मन लावून ऐकायच्या. त्यातून त्यांची वाङ्मयीन जडण-घडण, वाङ्मयविषयक आवडनिवड होत गेली. साने गुरुजींच्या सहवासात लोकसाहित्यविषयक कामाला गती मिळत गेली. श्री. म. माटे यांच्यामुळे त्यांना पुण्याच्या साहित्य परिषदेमध्ये काम करण्याची संधी मिळाली. पुढे त्या साहित्य पत्रिकेच्या संपादक झाल्या. वि. भि. कोलते यांच्यासोबत त्यांनी शब्दकोशाच्या संपादनाचे काम केले, इतकेच नव्हे तर त्यांना साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळात स्थान मिळाले. सरोजिनी बाबर जिद्दी होत्या, कष्टाळू होत्या, काम करण्याची चिकाटी त्यांच्याकडे होती. या गुणांच्या बळावर अनेक मानाची पदे त्यांच्याकडे चालत आली होती.

कृष्णराव बाबर यांचा सर्वच क्षेत्रातला वावर लक्षणीय होता. राजकीय क्षेत्रातील अनेकांशी त्यांचे अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध होते. यशवंतराव चव्हाण, वसंतदादा पाटील हे नातेवाईकच होते. त्यामुळे डॉ. सरोजिनी बाबर यांचा राजकारणातील प्रवेश सुलभपणे झाला. त्या मुंबई प्रांताच्या विधानसभेच्या सदस्य झाल्या, महाराष्ट्र विधानसभेच्याही त्या सदस्य होत्या. राज्यसभेच्या सदस्य म्हणूनही त्यांनी काम केले. त्यांची राजकीय कामगिरी आणि साहित्याचा व्यासंग पाहून त्यांची महाराष्ट्र लोकसाहित्य समितीच्या अध्यक्षपदी निवड झाली. १९६१ पासून त्या आयुष्याच्या अखेरपर्यंत या पदावर कार्यरत होत्या. त्यांच्यानंतर महाराष्ट्र लोकसाहित्य समिती नावापुरतीच राहिली. आज ह्या समितीचे अस्तित्वच संपुष्टात आले आहे.

डॉ. सरोजिनी बाबर यांनी महाराष्ट्र लोकसाहित्य समितीच्या माध्यमातून जे काम केले ते इतके महत्वाचे आणि वैशिष्ट्यपूर्ण आहे की, या कामामुळेच त्यांचे नाव साऱ्या महाराष्ट्रात झाले. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात फिरून त्यांनी लोकसाहित्यविषयक सामग्रीचे प्रचंड संकलन केले. प्रभाकर मांडे, गंगाधर मोरजे, पद्मा मोरजे, तारा परांजपे, मधुकर वाकोडे, लक्ष्मीकांत तांबोळी, सुमन

पाटील, अनिल सहस्त्रबुद्धे, कमलाबाई देशपांडे, अनुसूया लिमये अशा अनेक अभ्यासकांना एकत्र करून हे संकलनाचे काम केले. शरदिनी आणि कुमुदिनी ह्या त्यांच्या बहिणींची त्यांना सतत मदत होत असे. संकलित केलेली सारी सामग्री डॉ. सरोजिनी बाबर यांनी लोकसाहित्य समितीमार्फत ग्रंथरूपाने प्रकाशित केली. 'जनलोकाचा सामवेद, कुलदैवत, भोंडला-भुलाबाई, श्रावण-भाद्रपद, दसरा - दिवाळी सण-उत्सव, आदिवासींचे सणउत्सव, बाळराजा, जा माझ्या माहेरा, राजविलासी केवडा, जाईमोगरा, नादब्रह्म, सुंबरान, कारागिरी, रांगोळी, सांगोवांगी, एक होता राजा असे शेकडो ग्रंथ डॉ. सरोजिनी बाबर यांनी संपादित केले आहेत. महाराष्ट्राच्या सामाजिक, सांस्कृतिक जीवनाचे समग्र दर्शन या पुस्तकांमधील लोककथा, लोकगीतांमधून होते. ग्रामजीवनातील लोकांच्या भावाभिव्यक्तीचे आणि भाषाभिव्यक्तीचे आकलन होण्याच्या दृष्टीने हे ग्रंथ अत्यंत मौलिक ठरतील, असे आहेत. डॉ. सरोजिनी बाबर यांना मराठी संस्कृती, परंपरा यांचा अभिमान वाटत होता. संस्कारशील जीवनपद्धती, मूल्यव्यवस्था चालीरीती, बोली यांविषयीची ओढ त्यांना होती. त्यामुळे लोकसाहित्यविषयक सामग्रींचे विवरणही त्यांनी याच भूमिकेतून केले आहे. त्यांचा पिंड चिकित्सक संशोधकाचा नसून आस्वादक भारावलेल्या भक्ताचा आहे. अर्थात त्यामुळे त्यांच्या कामाचे मोल तसूभरही कमी होत नाही. मराठी लोकजीवनाचे अत्यंत व्यापक दृष्टीने केलेले हे संकलन अभ्यासकांच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे आहे. या साऱ्या ग्रंथसंभारातून अनेक पी.एच.डी. प्रबंध लिहून होतील इतका महत्त्वाचा ऐवज डॉ. सरोजिनी बाबर यांनी अभ्यासकांकडे सुपूर्द केला आहे. एक अभिनव स्वरूपाचा लोकसाहित्याचा शब्दकोश त्यांनी संपादित केला असून तो मराठीतील एकमेव लोकसाहित्य शब्दकोश आहे.

डॉ. सरोजिनी बाबर यांनी राजकीय, सामाजिक आणि वाङ्मयीन क्षेत्रात स्वतःच्या कार्यकर्तृत्वाने ठसा उमटविला होता. एक दराराही निर्माण केला होता. त्यांनी राज्यसरकारकडे सादर केलेला एखादा प्रस्ताव नामंजूर करण्याचे धैर्य अधिकाऱ्यांकडे नव्हते. त्यामुळे त्यांनी अनेक लोकसाहित्यविषयक संमेलने, चर्चासत्रे, शिबिरे यांचे आयोजन केले होते. १९६१ साली 'लोकसाहित्य आणि लोकसंस्कृती', १९६४मध्ये 'लोकसाहित्य : साजशिणगार' या चर्चासत्रांचा येथे उल्लेख करता येईल. स्वतः त्या वेळचे मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण, त्रि. रा. नरवणे, म. म. दत्तो वामन पोतदार, वि. का. राजवाडे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, अनंत काणेकर, ग. ल. ठोकळ, शंकरराव खरात, गिरीजाबाई केळकर, मधुसुदन वैराळे असे अनेक मान्यवर सहभागी होते. अनेकांनी निबंधही सादर केले होते. त्याचेही ग्रंथ महाराष्ट्र लोकसाहित्य समितीने प्रकाशित केले. सरोजिनी बाबर यांचा अफाट लोकसंपर्क, त्यांचे संघटन कौशल्य, नियोजनातील शिस्त, नेतृत्व देण्याची क्षमता या सर्व गोष्टींमुळे हे कार्यक्रम यशस्वीपणे पार पडले.

हे सर्व करीत असताना डॉ. सरोजिनी बाबर यांनी स्वतंत्रपणाने बहुविध वाङ्मयप्रकारातून लेखन केले. १२ कादंबऱ्या, दहा कथासंग्रह, कविता आणि ललित स्वरूपाचेही लेखन केले. 'माझ्या खुणा माझ्या मला' या आत्मपर लेखनावरोबरच निबंध, प्रबंध, बालवाङ्मय या प्रकारात लेखन केले. या साऱ्या लेखनावर लोकजीवन आणि लोकसंस्कृतीचा प्रभाव जाणवतो. लोकबोलीची अस्सल रूपे त्यातून अभिव्यक्त झालेली आहेत.

२० एप्रिल २००८ रोजी त्यांची प्राणज्योत मालवली. अखेरच्या काळात आजारपणामुळेच त्यांचे काम थांबले होते; पण अथकपणे त्यांचे काम आयुष्यभर अखंडपणे सुरू होते. एका छोट्या खेड्यातील मुलीने केलेले अफाट कार्य अक्षरशः अचंबित करणारे आहे. त्यांच्या कार्याची दखल घेऊन अनेक स्वयंसेवी संस्थांनी त्यांचा गौरव केला. राहुरीच्या म. फुले कृषि विद्यापीठाने त्यांना डी. एस्सी., टिळक महाराष्ट्र विद्यापीठाने डी. लिट्., भारती विद्यापीठाने व सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाने त्यांना जीवनगौरव पुरस्काराने सन्मानित केले. कोल्हापूरच्या ताराराणी विद्यापीठाने त्यांना भद्रकाली पुरस्काराने सन्मानित केले होते. बार्शी येथील शिवाजी महाविद्यालयाच्या डॉ. भारती रेवडकर यांनी त्यांच्या साहित्यावर संशोधन करून पीएच. डी. पदवी संपादित केली आहे. म्हणूनच मला वाटते, डॉ. सरोजिनी बाबर जडित्राचे लेणे लेऊन आलेल्या भाग्यवान विदुषी होत्या.

●

**प्रा. विश्वनाथ शिंदे**
फ्लॅट नं. ४०१, 'बी' बिल्डिंग,
साई ॲम्बियन्स, पिंपळे सौदागर,पुणे -२७
चलभाष : ९८९०४१८०२८



अनुक्रमणिका



लेख

डॉ. प्रभाकर देसाई

# १९ व्या शतकातील मराठी समीक्षेचे पुनरावलोकन

१९व्या शतकातील मराठी समीक्षेचा साक्षेपी आढावा घेणारा डॉ. प्रभाकर देसाई यांचा लेख.

मराठी समीक्षेचे आता तिसरे शतक सुरू झाले आहे. दोन शतकांच्या मराठी समीक्षेचा विस्तृत पट आपल्या अवलोकनासाठी उपलब्ध झाला आहे. हे अवलोकन समस्यामूलक दृष्टिकोनातून करण्याची नितांत आवश्यकता आहे. आपल्याकडे अशा पर्यावरणाची निर्मिती होण्याऐवजी आस्वादक व्यापाराचेच पीक अधिक आहे. ह्याला आपल्या समीक्षापरंपरेतील दुवे कारणीभूत आहेतच. त्याहीपेक्षा ऐतिहासिक आकलनाचा अभाव हेही एक महत्त्वाचे कारण आहे. ह्या अनुषंगाने १९व्या शतकातील समीक्षेकडेसुद्धा गौरवाच्याच चष्म्यातून पाहिले गेले आहे; पण ह्या कालखंडातील समीक्षेचे विस्ताराने महत्त्वमापन करण्याची नितांत आवश्यकता आहे. हा लेख म्हणजे ह्या प्रकल्पासाठीचा स्थूल आरेखनवजा प्रयत्न होय. १९व्या शतकात मराठी समीक्षेचा चेहरामोहरा संस्कृतमधील साहित्यविचाराचाच असला तरी ही चर्चा अगदीच प्राथमिक स्वरूपाची आहे. अगदी श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांची रसविषयक चिकित्साही अशाच पठडीतील आहे. मराठीमध्ये संस्कृत साहित्यविचाराकडेही पुरेशा गांभीर्याने पाहिले गेले नाही. अलंकारविषयक जे जे म्हणून ग्रंथ लिहिले गेले, त्यांचे स्वरूप केवळ माहितीवजाच आहे आणि त्यांना सुमार दर्जाच प्राप्त झाला आहे. भारतीय साहित्यशास्त्रातील विविध सिद्धान्तांची पद्धतशीर चर्चा करावी, असे कोणत्याही समीक्षकाने केलेले नाही. मराठीच्या स्वतंत्र अशा साहित्यशास्त्राची मांडणी तर मग खूप लांबची गोष्ट ठरते. याचे एक कारण हेही असावे की, १३व्या शतकापासून ते १९व्या शतकापर्यंत खुद्द संस्कृतमध्येही स्वतंत्र अशी ग्रंथसमीक्षा आढळत नाही. अपवाद फक्त क्षेमेन्द्राच्या औचित्यविचारचर्चा या ग्रंथाचा. संस्कृतमध्ये किमान सिद्धान्तांच्या चर्चेची सवय तरी होती; पण मराठीला मात्र स्वतंत्र ग्रंथसमीक्षेचे अथवा समीक्षाविचाराचे क्षेत्र नव्हतेच. साहित्याच्या निर्मितीबरोबरच साहित्याच्या समीक्षेचा व्यवहार अस्तित्वात येत असतो; पण ही जाणीवच तत्कालीन मराठी रचनाकारांना झाली नव्हती, असे म्हणायला हरकत नाही. पुढे इंग्रजी राजवटीत नियतकालिकांचा उदय झाला आणि मग ग्रंथपरीक्षणाच्या पातळीवर समीक्षेची काहीएक चर्चा मराठीत होऊ लागली. ही परिस्थिती इंग्रजी साहित्यकृतींवरील इंग्रजी साहित्यसमीक्षेच्या झालेल्या परिचयामुळे दिसते. तत्कालीन समीक्षक हे बहुतांशी लेखकच होते आणि त्यांनी समीक्षकाची भूमिकासुद्धा प्रसंगानुरूपच साकारलेली दिसते. ग्रंथकर्त्याला उत्तेजन देणे असा एकमेव उद्देश या समीक्षेचा होता. एखाद्या ग्रंथाचा सुबोध अर्थ सांगणे, त्यातील अलंकार शोधून काढणे आणि





अनुक्रमणिका

ग्रंथकर्त्याकडे अतिशय भावुकपणे पाहणे, असा एका अर्थाने आत्मशुद्धीचाच प्रकार ह्या समीक्षेत खूप होता. खरे तर मराठी साहित्याच्या पुनरुज्जीवनाचा तो काळ होता आणि अशा साहित्याची साधी चर्चासुद्धा मराठीला अगदीच नवीन होती. जुन्या मराठी गद्यपद्य वाङ्मयाशी म्हणावा तेवढा परिचय तत्कालीन लेखकांना नव्हता आणि नव्या इंग्रजी वाङ्मयाचीही केवळ तोंडओळखच झाली होती. अशा परिस्थितीत मराठीत स्वतंत्र साहित्यनिर्मितीचे क्षेत्रच थंडावले होते. भाषांतरित वाङ्मयकृती निर्माण करण्यावरच खासा भर होता. मुळात लिहिणारे कमी व वाचणारेही कमी या न्यायाने ग्रंथकर्त्यांची केवळ पाठराखण करणे यापेक्षा समीक्षेचे वेगळे स्वरूप असू शकेल अशी शंकाही उपस्थित करणेही अपराधीपणाचे वाटावे, अशी परिस्थिती होती. अर्थात, प्राचीन कवींचे श्लोक व आर्या सटीप प्रकाशित करण्याचे कार्य दादोबा पांडुरंग तर्खडकर(१८५६) व परशुरामपंत तात्या गोडवोले(१८६७) यांनी केले. त्यांच्या टीकालेखनाची मीमांसा(केकादर्श प्रस्तावना) पाहिली की, त्यांच्या समीक्षेचे स्वरूपही कळते. 'हा ग्रंथ जरी प्राकृत भाषेत केला आहे. तरी कवीने यात संस्कृत शब्द फार घातले आहेत, आणि कोठे संक्षेपाने, कोठे अन्योक्तीने वर्णन केले आहे. त्यामुळे याचा भावार्थ प्राकृत जनांच्या तर काय; पण पंडित जनांच्याही मनात विचार केल्याशिवाय लवकर यावयाचा नाही.' रचनाकाराची प्रशंसा व त्याच्याविषयीची आदरबुद्धी असेच या दोघांच्या समीक्षेचे स्वरूप होते. अर्थात, प्राचीन मराठी कवींच्या रचनांचे संकलन व त्यासाठी संशोधन अशी कोणत्याही शास्त्राच्या सिद्धीसाठी लागणारी प्राथमिक अवस्था मराठीत होती हे समाधानही थोडके नाही; पण समकालीन लेखकांच्या बाबतीत मात्र तत्कालीन समीक्षक प्रशंसा, आदर अशा कायम पाठराखणीच्याच भूमिकेत दिसतात. म्हणूनच चिपळूणकरांना 'सत्परीक्षकांचा' अभाव दिसतो व त्यामुळेच 'चांगल्यास व वाईटास हल्ली एकाच पंक्तीत बसणे येते हे खरे' असे निरीक्षण ते नोंदवतात. ते स्वत: साहित्याकडे आधी सामाजिक व नंतर कलात्मक अशा क्रमपद्धतीने पाहतात. खरेतर हा मराठी समीक्षेचे मूळ धरण्याचा काळ होय. त्यामुळे याच काळात समीक्षेविषयी एक निर्मळ व पोषक वातावरण तयार होणे गरजेचे होते. पण चिपळूणकर एकीकडे 'सत्परीक्षकां'चा अभाव आहे असे म्हणतात खरे; पण विद्वत्व व कवित्व या लेखात ते असेही म्हणतात, की 'राष्ट्रात प्रौढ वयाच्या सुमारास विचारशक्तीचे प्राबल्य होत गेल्याने कवित्वाचा ऱ्हास होतो.' हे असे म्हणणे समीक्षादृष्टीच्या विसंगतीचे लक्षण ठरत असल्याने, ते कोणत्या परिस्थितीत काढले, कुणाच्या प्रसंगाने काढले हे तपासणे गैरच.

महादेव मोरेश्वर कुंटे, का. बा. मराठे व महादेव गोविंद रानडे यांच्या अनुक्रमे राजा शिवाजी या काव्याची प्रस्तावना(१८६९), नावल व नाटक(१८७२) व मराठी वाङ्मयाची अभिवृद्धी : एक टिपण (१८९८) या तीन निबंधांतून प्रौढ असा समीक्षाविषयक दृष्टिकोन दिसून येतो. म. मो. कुंटे यांनी आपल्या प्रस्तावनेत कवितेची व्याख्या, अभिरुची, महाकाव्य, स्वच्छंदतावादी व अभिजात शैली, असा जसा समीक्षेचा स्वरूपपर विचार केला आहे, तसा विज्ञानशाखा आणि वाङ्मयशाखा असा उद्दिष्टपरही विचार केला आहे. कुंटे यांनी अभिरुचीचा विचार करताना तत्कालीन अभिरुचीचे तीन गट केले आहेत. शास्त्री व त्यांचे अनुयायी व इंग्रजी जाणणाऱ्या लोकांचा वर्ग या पहिल्या दोन गटांपेक्षा कुंटे यांना अशिक्षित असा शास्त्री आणि सुशिक्षितांच्या मतांची दखल न घेणारा तिसरा वर्गच अतिशय महत्त्वाचा वाटतो कारण तो आपल्या अंत:प्रामाण्यावर चालतो व आपल्या प्रकृतिधर्माला अनुसरून असणाऱ्या गोष्टीतच रस घेतो. हा तिसरा गट शेतकरी, कामकरी व कारागिरांच्या अभिरुचीचा आहे. पैकी पहिले दोन गट राजकीय क्रांतीच्या आणि धार्मिक संक्रमणाच्या काळात स्वाभाविकतेपासून दूर गेले आहेत व तिसऱ्या गटाने मात्र आपल्या स्वविशिष्ट भावना व अभिरुची यांची जपणूक केली आहे, असे कुंटे ह्यांचे मत आहे. कुंटे यांना वाङ्मयशाखा व विज्ञानशाखा यांची एकत्रित वाढ होणे, त्यांचा विकास होणे महत्त्वाचे वाटते. पाश्चिमात्य विज्ञान व कलांची आयात त्यांना पटत नाही. साहित्य लोकभावनेचे रंजन करणारे असावे, असे ते मानतात. साहित्यातून खालच्या वर्गाची पातळी उंचावण्याची सहभावना जशी विकसित झाली पाहिजे, तशीच त्याने वरच्या श्रीमंत वर्गाला मानवतावादी दृष्टीही दिली पाहिजे, अशा मताचे कुंटे आहेत. कुंटे यांनी शैलीविषयक विचार मांडताना शैलीचे स्वच्छंदतावादी व अभिजात असे प्रकार केले आहेत. त्यांनी स्वच्छंदवादी शैलीचा पुरस्कार केला आहे. शहरात व खेडोपाडी बोलल्या जाणाऱ्या सर्वसामान्यांच्या मराठी भाषेत तीच शैली असते, असा ते निर्देश करतात. म्हणून वसंत आबाजी डहाके (२००१) यांना कुंटे यांच्या प्रस्तावनेतील विचारांत जशी देशीवादाची बिजे दिसतात त्याचप्रमाणे मराठीचे साहित्यशास्त्र वेगळे असले पाहिजे, याची जाणीवही दिसते.

का. बा. मराठे यांनी नावल व नाटक या निबंधात कादंबरी व नाटक या वाङ्मयप्रकारांचे स्वरूप निश्‍चित करण्याचा प्रयत्न केला आहे. नव्याने निर्माण झालेल्या कादंबरी या वाङ्मयप्रकाराला त्यांनी 'नावल' हा शब्द वापरला आहे. कोणत्याही भाषेतील साहित्याची समीक्षा ही प्रारंभी व तद्‌नंतरही सदैव विकासोन्मुख असते. तिचा विकास एकेरी नसतो. ती अधिकाधिक सूक्ष्म आणि त्याच वेळी परिपूर्ण होण्याचा प्रयत्न करीत असते. याची प्रचिती मराठेंच्या या निबंधावरून येते. महादेव गोविंद रानडे यांना अभिजात भाषेतील व इंग्रजीतील आदर्शांचे अध्ययन आवश्यक वाटतेच; पण मराठी साहित्याच्या अभिवृद्धीसाठी स्वकीय प्राचीन कवींचे अध्ययनही त्याहून महत्त्वाचे वाटते. मराठी साहित्याचे, साहित्याच्या समीक्षेचे स्वरूप व उद्दिष्टे मराठीच्याच संक्रमणकाळात निश्‍चित करण्याचे हे तिघांचे योगदान त्यांच्यातील सक्षम समीक्षादृष्टीची जाणीव करून देते.

१९व्या शतकातील साहित्यविचार अथवा समीक्षाविचार हा प्रामुख्याने नियतकालिकांमधूनच प्रकाशित झाला आहे. विचारप्रसाराची व प्रबोधनाची सर्वांत मोठी व प्रबळ साधने म्हणून या काळात नियतकालिकांनी साहित्याच्याही निर्मितीस पोषक वातावरण तयार केले. वाङ्मयविचाराच्या दृष्टीने या काळातील आणखी एका लेखाची नोंद केली पाहिजे. चिपळूणकरांच्या विद्वत्त्व व कवित्व या लेखाच्या पार्श्वभूमीवर जनार्दन सखाराम गाडगीळ यांच्या लिहिण्याची शैली या लेखाकडे पाहता येते. आपण वर उल्लेखल्याप्रमाणे चिपळूणकरांच्या मते, विचारशक्तीच्या प्राबल्याने कवित्वाचा ऱ्हास होतो. गाडगीळांना मात्र कल्पनाशक्तीचे व विचारशक्तीचे एकत्र येणे आवश्यक वाटते. गाडगीळांनी लेखक व चित्रकार यांच्या कार्यपद्धतीतील साधर्म्य शोधण्याचा प्रयत्न केला आहे. याचाच अर्थ गाडगीळांच्या ठिकाणी केवळ साहित्यविचारच आहे, असे नसून त्यांनी एकंदरीत कलाव्यवहाराचीच जाणीव मांडण्याचा प्रयत्न केला आहे. म्हणून वा. ल. कुलकर्णी यांना हा विचार वाङ्मयकलेच्या प्रकृतीसंबंधी निर्माण होत असलेल्या नवीन जाणिवेचा निदर्शक वाटतो. या काळात नियतकालिकांमधून येणाऱ्या साहित्यविचाराचे स्वरूपही बरेचसे काव्य व कविताविषयकच होते; पण जुन्या मराठी कवितेचे पुनरावलोकन व नवीन इंग्रजी कवितेचा परिचय अशा संक्रमणबिंदूवरचे हे विवेचन असल्याने त्यात सुसूत्रता आढळत नाही. १३व्या शतकापासून ते १९व्या शतकापर्यंत मराठीत स्वतंत्र असा समीक्षात्मक ग्रंथही सिद्ध झालेला नव्हता. त्यामुळे ही काव्य वा कविताविषयक चर्चाही चाचपडतच होताना दिसते. म्हणूनच केशवसुतांना कवितेमधूनच स्वत:चे काव्यशास्त्र मांडावे लागले, असे म्हणण्याचा प्रघात आहे. एकोणिसाव्या शतकातील एका कवीने केलेला हा काव्यविचार पुढे मराठी कवितेच्या संदर्भात चालना देणारा ठरला. कविता आणि कवी, काव्याचे प्रयोजन, काव्यकारण, काव्यनिर्मिती प्रक्रिया, काव्याचा आस्वाद, काव्य आणि समाज अशा विविध गोष्टींवर केशवसुतांची कविता भाष्य करून जाते; पण तरीही स्वतंत्र अशी काव्यविषयक चर्चा ग्रंथरूपाने करण्यात हा काळ निष्प्रभच ठरतो. किंबहुना, अशा स्वतंत्र मांडणीची जाणीवच तत्कालीन कवींना नव्हती, हेच मान्य करावे लागते. यादृष्टीने मौखिक परंपरेचे अथवा हस्तलिखितांच्या स्वरूपात असलेल्या साहित्यशास्त्रात्मक ज्ञानाचे मराठी कवी व श्रोते-वाचक-अभ्यासकांना ब्रिटिश सत्तेच्या आगमनापूर्वीच विस्मरण झाले होते, असे म्हणणेच सयुक्तिक वाटते.[१]

गोपाळ गणेश आगरकर ह्यांचा कवि, काव्य, काव्यरती (१८६६:८७) हा काव्याची सखोल मीमांसा करणारा निबंध आहे. काव्याचे काव्यत्व व काव्यानंदाची चर्चा त्यांनी केली आहे. काव्य या शब्दाची व्याप्तीसुद्धा त्यांनी मांडलेली आहे. काव्यानंदाची चर्चा करताना त्यांनी काव्य आणि शास्त्रीय ग्रंथ यांच्यातील भेद सांगितला आहे. मात्र काव्यग्रंथाची शास्त्रीय ग्रंथाशी असलेली जवळीकही ते सांगतात. त्यांच्या मते,'ज्यात सत्यनिरूपण नाही तो शास्त्रीय ग्रंथ जसा कवडीच्या मोलाचा, त्याप्रमाणे ज्यात सत्यनिरूपण नाही असा काव्यग्रंथही कवडीच्या मोलाचा.' पण या दोहोंतील सत्यनिरूपणाच्या पद्धती वेगळ्या असतात याचे भान आगरकरांना आहे; पण गंमत अशी आहे की, मराठीत ज्याच्या आधारे ही चर्चा व्हायला पाहिजे असा स्वतंत्र मराठीचा काव्यशास्त्रग्रंथ मात्र तेव्हा उपलब्ध नव्हता. ही चर्चा संस्कृत ग्रंथ व इंग्रजी ग्रंथांच्या परिचयात्मक आधारेच चालली होती. अर्थात, मराठीच्या स्वतंत्र समीक्षाशास्त्राची मांडणी त्यांना अभिप्रेत होती, असे मात्र स्पष्ट होत नाही. गोपाळ गणेश आगरकर व लोकमान्य टिळकांचे तत्कालीन वाङ्मयविषयक लेखन हे प्रासंगिक स्वरूपाचेच होते. आगरकरांनी समीक्षकाला आवश्यक असणारी शास्त्रीय दृष्टी प्रकट केली आहे, हे मात्र वादातीत कारण चिपळूणकरांनी मेकॉलेच्या प्रभावातून शास्त्रीय युग काव्यास विघातक ठरवले होते; पण आगरकरांना मात्र







अनुक्रमणिका

अंतर्बाह्य सृष्टीचे विषय व त्यांची अद्‌भुतरम्यता महत्त्वाची वाटते. महाराष्ट्रात चांगले ग्रंथ का निर्माण होत नाहीत, हे सांगताना त्यांनी पारतंत्र्याचा मुद्दा ऐरणीवर आणला. या मुद्द्यातून देशहित व समाजहिताचे उद्दिष्ट मांडणे सुधारक म्हणून आगरकरांचे हे उच्च ध्येय असले तरी उपजत साहित्याची आवड असल्यामुळे त्यांची साहित्यचर्चा येथे केवळ अनुषंगिक वाटत नाही. पारतंत्र्याचा मुद्दा साहित्याच्या संदर्भात ते मांडतात कारण पारतंत्र्याचा व तत्कालीन भौतिक परिस्थितीचा अन्योन्यसंबंध असतो. त्यांनी वाङ्मयावर भौतिक परिस्थितीचा परिणाम होतो असे सांगितले आहे. आगरकरांच्या टीकालेखांचे स्वरूप केवळ वाङ्मयीन स्वरूपाचे नव्हते, तत्कालीन प्रतिपक्षाच्या मतांचे खंडन हाच उद्देश होता; पण चिपळूणकरांच्या भूमिकेपेक्षा आगरकरांच्या टीकालेखांचे स्वरूप व्यापक आहे, यात शंका नाही. आगरकरांची टीका केवळ विद्वत्तेपोटी वा अहंपणाच्या जाणिवेतून निर्माण झालेली नाही. चिपळूणकरांच्या टीकालेखनात मात्र अभिनिवेश आढळतो. ते प्रतिपक्षावर 'कडाका' उठविण्याची भाषा करतात. चिपळूणकरांनी मराठी भाषेचे व साहित्यसमीक्षेचे सूत्र बिघडवले आहे, हे खरेच आहे.

राजकीय, सामाजिक वा आर्थिक विचारसरणीचा परिणाम १९व्या शतकातील उत्तरार्धात व २०व्या शतकाच्या पूर्वार्धात जसा मराठी वाङ्मयावर झाला, त्याहीपेक्षा जास्त तत्कालीन टीकालेखनावर झाला आहे. चिपळूणकर वा त्यानंतरच्या नवलेखकांनी वाङ्मय हे केवळ परतंत्र राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून देण्याचे एक साधन अशी कल्पना पक्की केली. पूर्वीच्या लेखकांची केवळ ज्ञानदानाची (मग ते कोणत्याही स्वरूपाचे का असेना) दृष्टी या काळात स्वातंत्र्यप्राप्तीकडे वळली. ज्या वाङ्मयात राष्ट्रीय ध्येयवाद नाही ते हिणकस अशी वृत्ती याच काळात निर्माण झाली व बळावलीसुद्धा. राष्ट्रजागृतीच्या काळात लेखक व टीकाकारांनी आपला दृष्टिकोन विशिष्ट प्रकारचाच ठेवला. सामाजिक व राजकीय अन्यायाचे परिमार्जन हेच टीकालेखनाचे ध्येय होते. त्यामुळे कलाव्यवहारातला समतोलपणा त्यात आलाच नाही. मराठीची पूर्वपरंपराही अशी नव्हती. कलाव्यवहारातला समतोलपणा ही फार लांबची गोष्ट; पण कलेचेच काय, साहित्याचे प्राथमिक शास्त्रही मराठीजवळ नव्हते. या पार्श्वभूमीवर मात्र वरील टीकालेखकांचे कार्य उल्लेखनीय ठरते. त्यात कलाव्यवहारातील समतोलपणा नसला तरी तत्कालीन सामाजिक अभिरुचीचे अवलोकन करण्यास तरी ते उपयोगी पडणारे आहे. प्रखर मतप्रचार वा केवळ ध्येयदृष्टी असलेल्या या टीकेचे स्वरूप नंतर श्री. कृ. कोल्हटकरांच्या व न. चिं. केळकरांच्या टीकालेखनामुळे थोडेफार कमी झाले. कोल्हटकरांनी मतप्रचारकांतही असलेल्या ढोंगी टीकाकारांचे स्वरूप उघडे पाडले. वाङ्मयीन व सामाजिक क्षेत्र त्यांच्या टीकेचे मुख्य आधार राहिले. सभा-संमेलने ही ग्रंथनिष्पत्तीस उपयोगी न ठरता वैयक्तिक चर्चेची केवळ ठिकाणे होतात, हे मर्म चोरांचे संमेलन व साहित्यपरिषदेची तयारी या लेखांतून उघड केले आहे. कोल्हटकरांनी मराठी वाङ्मय व स्वावलंबन(१९१७) या लेखात वाङ्मय शब्दाची विस्तृत व्याप्ती सांगितलेली आहे. शास्त्रीय म्हणजे बोधपर व शुद्ध काव्यमय म्हणजे रसमय असे वाङ्मयाचे दोन भेद ते मांडतात. ललित वाङ्मयाला ते 'सारस्वत' म्हणतात, तर शास्त्रीय वाङ्मयाला ते 'गाणपत' म्हणतात. संतकवींनी भक्तिरसाकडेच संपूर्ण लक्ष दिल्यामुळे काव्याच्या प्रधान हेतूकडे म्हणजे रसिकानंदाकडे दुर्लक्ष झाले. त्यामुळेच मराठी वाङ्मयाची सर्वांगीण प्रगती झाली नाही, अशा आशयाचे मत ते व्यक्त करतात. मराठीच्या परावलंबित्वाचा मुद्दा जसा वा. ब. पटवर्धनांनी मांडला तसाच तो कोल्हटकरांनीही मांडला आहे. उसनवारीमुळेच आमचे काव्य पराभूत झाले. अगोदर संस्कृत व नंतर इंग्रजीमुळे ही परपुष्टता कायम आहे, असा त्यांचा अभिप्राय आहे. परावलंबी पुस्तकांची वाढ इष्ट नाही, असा इशारा कोल्हटकरसुद्धा देतात. माधवनिधन नाटक (१९००) या लेखात त्यांनी कलामीमांसा केली आहे. सगळ्या कला निसर्गापासूनच निघालेल्या असल्या तरी निसर्गाचा व कलेचा हेतू भिन्न आहे, अशी त्यांची मांडणी आहे. किंवहुना, निसर्गबद्ध वस्तू नियमबद्ध असल्या तरी त्या अहेतुक असतात, असे त्यांचे मत आहे. कलेला मात्र निश्चित हेतू असतो व त्यांच्या मते, निसर्गाचा वैचित्र्याकडे व कलेचा ऐक्याकडे कल असतो. समीक्षेच्या सुसूत्रीकरणाचे प्रयत्न म्हणून हे उल्लेख महत्त्वाचेच आहेत. तोतयाचे बंड या नाटकाचे कोल्हटकरांनी प्रदीर्घ परीक्षण(१९१४) केले आहे व त्यांनी आपली कलामीमांसा मांडली आहे. कलांचा उगम कसा होतो, ललित कला आणि उपयुक्ततावादी दृष्टिकोन यांच्यातील भेद, कलांची साधने यासंदर्भातील कलामीमांसा त्यांच्या या परीक्षणात दिसते. ललित कलेचा आनंद सर्वांना होतो व तशीच त्याची प्रकृती असते, असे त्यांचे मत आहे. कलांचे भिन्नत्व त्यांनी ॲरिस्टॉटलच्या मतांच्या आधारे मांडले आहे. कलामीमांसा, अभिजातवाद व स्वच्छंदतावादाच्या आधारे



अनुक्रमणिका

ते आपला नाट्यकलाविचार मांडतात व उदाहरण म्हणून एका नाट्यकृतीचे पृथक्करण करतात. म्हणूनच डहाके यांच्या मते, वि. का. राजवाडे यांचा कादंबरी हा निबंध(१९०२) जसा कादंबरीमीमांसेतील विचारप्रवर्तक निबंध आहे तसाच कोल्हटकरांचा तोतयाचे बंड हा नाट्यमीमांसेतील महत्त्वाचा निबंध आहे. या नाट्यपरीक्षणाला जवळजवळ स्वतंत्र प्रबंधाचेच स्वरूप आले आहे, असे म्हणता येईल. कोल्हटकरांच्या काळात संस्कृत नाटकांच्याच प्रस्तावनेची मराठीतील संगीत नाटके अनुकरण करीत असत. या प्रस्तावनेवर कोल्हटकरांनी टीका केली. नटीचा राग, कंचुकीचे वार्धक्य, विदूषकाचा अघाशीपणा यांना बंदी व्हावी, अशा प्रकारची त्यांची सूचना त्या काळाच्या मानाने क्रांतिकारकच होती.

द. के. केळकरांनीही काव्य, नाटक, चरित्र, निबंध, इतिहास इ. वाङ्मयप्रकारांतील ग्रंथांवर प्रस्तावनेच्या रूपाने व स्वतंत्रपणेही लेखन केले. कलामीमांसा करताना काही उपपत्ती मांडण्याचाही प्रयत्न केला. सविकल्प समाधीची उपपत्ती त्यांनी काव्यानंदाच्या संदर्भात मांडली आहे. ज्या ठिकाणी आत्मौपम्यबुद्धी म्हणजेच समानधर्मीत्व असते तेथेच जिव्हाळा निर्माण होतो व या जिव्हाळ्यातूनच तादात्म्य शक्य होते, अशा प्रकाराची त्यांची मांडणी आहे. अर्थात या सविकल्प समाधीच्या मांडणीत त्रुटी जरूर आहेत. वाङ्मयातील पात्रे नेहमीच जिव्हाळा निर्माण करणारी असतील असे नसतेच आणि काव्यानंदाला समाधीसदृश अवस्थाच मानणे यातून जसा तादात्म्याचा विचार, तसा ताटस्थ्याचा मात्र विचार केळकरांनी केलेला नाही. केळकरांच्या मानाने कोल्हटकरांचा कलाविचार जास्त निर्भेळ होता. कोल्हटकरांनी त्या त्या वाङ्मयप्रकाराचे स्वरूप बारकाईने समजून घेतले होते. उदा. नाटकाला वाङ्मयाप्रमाणेच संगीत, नृत्य, वास्तू, शिल्प इ. कलांचेही साहाय्य असते, याची त्यांना जाणीव आहे. कोल्हटकरांनी तोतयाचे बंडच्या रूपाने जो नाट्यकलाविचार मांडला, तशीच विचारप्रवर्तक सुसूत्रता आणणारी कामगिरी वि. का. राजवाडे यांनी कादंबरी या निबंधातून केली होती. म्हणून एखाद्या साहित्यप्रकाराची विचारप्रवर्तक मांडणी करणारे राजवाडे कोल्हटकरांपेक्षा ऐतिहासिक दृष्टीने अग्रणी ठरतात. साहित्यप्रकाराची पहिली महत्त्वपूर्ण समीक्षा का. बा. मराठे (१८७२) यांनी केली. त्यानंतर ती राजवाडेंनी केली आहे. कादंबरीच्या साहित्यशास्त्राचे आमुख, अशी त्यांच्या निबंधाची कामगिरी सांगता येईल. राजवाड्यांनी १९०२पूर्व, ऐंशी वर्षातील गद्य ग्रंथांची जी निर्मिती झाली, तिच्या आधारे कादंबऱ्यांना त्यांनी अग्रस्थान दिले आहे. राजवाडे साहित्याला 'सारस्वत' म्हणतात व त्या अनुषंगानेच कादंबरीला 'कादंबरी सारस्वत' म्हणतात. राजवाडेंनी कादंबरीचे वर्गीकरण लहान गोष्टी, अद्‌भुत कथा व वस्तुस्थित्यादर्शक कथानके असे केले आहे व हे तीन घटक म्हणजे कोणत्याही कादंबरीची पायरीवजा ऐतिहासिक परंपरा असते, असेही सांगितले आहे. म्हणजेच लहान गोष्टी, अद्‌भुत कथा व वस्तुस्थित्यादर्शक कथानके हा कादंबरी या वाङ्मयप्रकाराचा ते विकासक्रमच मानतात. लहान गोष्टीतच अद्‌भुत व वास्तविक कथानकांचा प्रादुर्भाव झाला व पुढे या दोन प्रकारांचा परिपोष होऊन अद्‌भुत कादंबऱ्या व वास्तविक कथानकांचा विकास झाला, असे ते म्हणतात. कादंबरीच्या संदर्भात त्यांनी अद्‌भुत व वास्तव या दोन प्रवृत्तींचा आढावा घेतला आहे. अनंत सृष्टीवर मनुष्याचा काडीचाही तावा नसतो, त्यामुळेच मनुष्याच्या दुर्बलतेची खात्री पटते. अद्‌भुताचा उगम मनुष्याच्या या दुर्बलतेतच आहे. त्यांच्या मते, वास्तविक सृष्टीत आपले काहीएक चालत नाही अशी खात्री झाल्यामुळेच मनुष्य कल्पनेची, अद्‌भुताची सृष्टी निर्माण करतो. मग अद्‌भुत सृष्टीतील अजब दुनिया अद्‌भुत कादंबऱ्यांचा विषय होते. 'वास्तविक सृष्टीतील अपूर्णता अद्‌भुत सृष्टींत पूर्णतेप्रत पोहोचलेली आढळते.'[१] राजवाडे यांना धर्म, नीती, वेदान्त, इतिहास, गणित, नाटक, कादंबरी, चित्रकला, मूर्तिकला, स्थापत्य, कायदा, कविता इत्यादी सर्व जागी अद्‌भुताचा प्रादुर्भाव दिसतो. शास्त्रांची व शास्त्राबाहेरील सर्वच गोष्टींची निर्मिती अद्‌भुताच्या पायावर होते, असे त्यांचे मत आहे. शास्त्रबाह्य गोष्टींत ते ललितकलांचा समावेश करतात व त्यांच्या मते ललितकला या अद्‌भुततेची माहेरघरेच होत. अद्‌भुत कल्पनांच्या सामर्थ्याचे मूळ राजवाडेंनी मनुष्यस्वभावाच्या वस्तुस्थितीतच आहे, हेही सोदाहरण दाखवून दिले आहे.[२]

अद्‌भुत कादंबरीची परंपरा महाराष्ट्रात जवळपास अडीच हजार वर्षांची आहे; परंतु मुक्तामाला, मंजुघोषा या अलीकडच्या अद्‌भुत कादंबऱ्या व पूर्वी धर्मांदी संस्थांच्या उपयोगी पडलेल्या अद्‌भुत कादंबऱ्या यात राजवाड्यांना बराच फरक जाणवतो. पूर्वीच्या कादंबऱ्या ह्या एका मताच्या प्रसारासाठी निर्माण केल्या गेल्या, तर अलीकडच्या कादंबऱ्यांत असा बाह्य हेतू दिसून येत नाही. १८४० ते १८६० ह्या काळातील अद्‌भुत कादंबऱ्या वा कथा या केवळ करमणुकीसाठी लिहिलेल्या आहेत. त्या काळातील या कादंबऱ्यांचे वाचक पाहिले, की राजवाडेंनी उल्लेखिलेली



अनुक्रमणिका

समाजाची किंकर्तव्यमूढता हेच कारण लक्ष्मणशास्त्री हळबे यांच्या करमणूकप्रधान अद्‌भुत कादंबरी लेखनामागे आहे, हे स्पष्ट होते. १८६०नंतर मात्र समाज आत्मपरीक्षणाकडे वळला व पुढे कादंबऱ्यांतही बदल होत गेला, असे राजवाडे दाखवतात. के. ल. जोरवेकरांची विचित्रपुरी (१८७०) ह्या बदलाचे पहिले प्रवर्तन आहे. तिच्यात राजवाडेंना अद्‌भुत व वास्तव यांचा संबंध दिसून येतो. राजवाडेंच्या मते अद्‌भुत कादंबरीची आपल्या देशातील भरपूर परंपरा आहे; पण तशी परिस्थिती वास्तविक कादंबऱ्यांची नाही. वास्तविक कादंबऱ्यांचा मुख्य झरा परदेशातला आहे. परदेशात हे असे झरे सर्वोत्तम व सर्वोत्कृष्ट आहेत; पण आपल्याकडील कादंबरीकार तिकडील सामान्य कादंबरीकारांचेच अनुकरण करतात. आपल्याकडचे लेखकही सर्वोत्तम लिहू शकतात; पण त्यांना आपल्या कलेच्या इतिहासाचे, तिच्या परंपरेचे जसे भान नाही त्याचप्रमाणे उत्तमोत्तम परकीय लेखकांच्या साहित्याचेही त्या काळात भान नाही. कोणत्याही कादंबरीत अद्‌भुत व वास्तविक यांचा संगम असला पाहिजे, असे ते मानतात. निव्वळ शुद्ध वास्तविक कादंबरी लिहिणे अशक्यच आहे. वास्तविक याचा अर्थ वर्तमानपत्रातील रिपोर्ट नव्हे व अद्‌भुत म्हणजे कादंबरी अत्यंत काल्पनिकही नव्हे. त्यांच्या मते, संपूर्ण समाज हाच कादंबरीचा विषय असतो. यासाठीच राजवाडे फ्रेंच वा रशियन कादंबरी अधिक सर्वोच्च आहे, असा निर्वाळा देतात. राजवाडेंच्या मते, कादंबरीकाराने लेखनविषय म्हणून समाजाचा कोणताही भाग वर्ज्य मानता कामा नये. सर्वांत प्रमुख गुण 'जाज्वल्य मनोवृत्ती' हा प्रत्येक कादंबरीकारात असलाच पाहिजे. असे सांगून ही मनोवृत्ती कृत्रिम पद्धतीने येत नाही, असेही ते सांगतात. अनुकरण कोणाचे करावे व कोणाचे करू नये, तसेच भाषांतरावरची गुजराण व उसनवारीसारख्या गोष्टी नाहीशा झाल्याखेरीज स्वभाषेत उत्तम कादंबरी निर्माण होणे अशक्य आहे, असे राजवाडे यांचे मत आहे. राजवाडेंनी युरोपीय कादंबरीकारांची उदाहरणे घेऊन सर्वोत्तम कादंबरीची कल्पना मांडलेली असली, तरी ह. ना. आपटे यांच्या कादंबऱ्यांतील गुण-दोष दाखवताना आपल्या समाजाविषयी जे चिंतन केले आहे त्यामुळे त्यांचा हा कादंबरीविचार खास कोटीतील झाला आहे.

१९२०च्या आसपास मराठी समीक्षकांना साहित्याचा विचार करताना इतर कलांचाही विचार केला पाहिजे याची जाणीव झाली होती. ही जाणीव म्हणजे एकंदरीत कलातत्त्वाचीच जाणीव होती, असे म्हटले जाते. साहित्याकडे कला म्हणून पाहू लागल्यानंतर साहित्याचा नेमका हेतू कोणता, कलेचा आणि नीतीचा काय संबंध आहे, कलेचे आणि जीवनाचे नेमके नाते काय, कलेचे मूल्य काय, कलांचे वर्गीकरण कशा प्रकारे शक्य आहे, यांसारख्या प्रश्नांची चर्चा मराठीत सुरू होणे अपरिहार्य होते. न. चिं. केळकरांनी कला व नीती या वादाला १९२१ साली सुरुवात करून दिली; पण त्यांना साहित्यकला व जीवन यांचे व्यापक संबंध मांडता आले नाहीत. वामन मल्हार जोशी यांच्या समीक्षेत मात्र कला आणि जीवनाचे संबंध व्यापक पातळीवर येताना दिसतात. वा. म. जोशी यांची एकंदरीत वाङ्मयविषयक भूमिकाच तुलनेने व्यापक आहे. त्यांच्या समीक्षेचे 'तात्त्विकता' व 'अनाग्रहपणा' हे गुण होत. त्यांच्या मते, विशिष्ट परिस्थितीत, विशिष्ट समाजात जे वाङ्मय असते त्याच्या निर्मितीला एकाहून अधिक कारणे असतात. त्या समाजाचा पूर्वेतिहास, तत्कालीन धर्म, चालीरीती, सांस्कृतिक दर्जा, नैतिक आचार-विचार; धार्मिक, आर्थिक परिस्थिती, तत्कालीन युगप्रवर्तक अथवा अलौकिक व्यक्तींचे अस्तित्व अथवा अभाव; लेखकाची, रसिकाची व्यक्तिगत जडणघडण; त्याचा सामाजिक दर्जा, त्याचे नेणिवेतील व जाणिवेतील-व्यक्तित्व अशा अनेक गोष्टींचा वाङ्मयव्यवहारावर परिणाम होतो. कलाविषयक एकांगी भूमिका ते घेत नाहीत. मन ज्ञान, नीती व कलाप्रिय असते. म्हणूनच सत्य, शिव व सुंदर या तिन्हींची एकात्मता त्यांना अभिप्रेत आहे. कलानंद हा सत्य, शिव आणि सुंदर यांच्याच चिंतनाने निर्माण होतो. तसेच कलेत जीवनविकासाचे सामर्थ्य असते म्हणून सर्वकालीन नीतितत्त्वे तिच्यात आढळतात, असे ते म्हणतात. वा. म. जोशी यांची कित्येक तत्त्वे व्यावहारिकदृष्ट्या संशयास्पद वाटतात. तात्त्विकदृष्ट्या ती तशी रचनात्मक आहेत, त्यांच्यात निश्चितपणा आहे. उदाहरणार्थ, भौतिक परिस्थितीने मनुष्याच्या स्वभावावर अप्रत्यक्ष परिणाम केला तरी त्याचा मूळ स्वभाव स्वतंत्र राहणारच, म्हणूनच कला ही व्यक्तिनिष्ठ व उपाधिनिरपेक्ष राहील, असे त्यांचे स्पष्ट मत आहे. नीतीचे स्वरूप परिवर्तनशील राहणार हे ते मान्य करतात. त्यांच्या समीक्षेतून चरित्रात्मक टीकापद्धतीची मर्यादासुद्धा स्पष्ट झाली आहे. समन्वयवादी टीकाकार असाही त्यांचा उल्लेख करता येईल.

१९२०नंतरच्या कालखंडातील कलावादी भूमिकेचे पुरस्कर्ते म्हणून ना. सी. फडके यांची समीक्षादृष्टी प्रतिभासाधन (१९३१) या ग्रंथातून दिसते. त्यांनी या ग्रंथात नीतिवादी भूमिकेवर टीका केली आहे. कलासौंदर्याचा निर्भेळ दृष्टीने आस्वाद घ्यावा, त्यात काही संदेश शोधू नये

अशी त्यांची भूमिका आहे. त्यांच्या मते, चित्रकला, शिल्पकला यांच्याप्रमाणेच वाङ्मय कला ही केवळ आल्हाद देणारी कला आहे. म्हणून नीतीचा पुरस्कार करणे, अनीतीचा उच्छेद अथवा तत्त्वसिद्धता ही कलेची उद्दिष्टेच नव्हेत. कलात्मकता, कलात्मक आनंद, मनोरंजन यांच्यातला भेद फडकेंच्या समीक्षेत दिसत नाही, त्यामुळे त्यांचा कलाविचार सूक्ष्म अथवा खोल नव्हता असे म्हणता येते. फडके प्रभृतींच्या 'कलेसाठी कला' या भूमिकेच्या पार्श्वभूमीवर कलावादाला विरोध करून वि. स. खांडेकरांनी जीवनवादाचा पुरस्कार केला. याच सुमारास मार्क्सवादी विचारसरणीचा प्रभावही मराठीमध्ये जाणवत होता. या प्रभावातून काहीएक साहित्यविचार व्यक्त झाला आहे. लालजी पेंडसे यांनी साहित्य आणि समाजजीवन (१९३५) या ग्रंथातून साहित्यविषयक भूमिका मांडली आहे. विशिष्ट भौतिक परिस्थितीत विशिष्ट प्रकारच्याच विचारसरणी व कलाकृती निर्माण होतात, अशी पेंडसे यांची भूमिका आहे. साहित्यात सामाजिक जीवनाचे प्रतिबिंब पडते, असे ते म्हणतात. पु. य. देशपांडे यांना पेंडसे यांची ही भूमिका मान्य नाही. त्यांनी प्रतिभा या पाक्षिकातून साहित्य आणि समाजजीवन (१९३६) ही लेखमाला लिहून कलावंताच्या जीवनविकासात विश्वविकासाचे सार साठलेले आहे, हे सोदाहरण पटवण्याचा प्रयत्न केला आहे. कलेचा जन्म व्यक्तिजीवन आणि समाजजीवन यांच्या संघर्षात अंतर्भूत असतो, असे देशपांडे म्हणतात. एकंदरीत, कलावाद व जीवनवाद यांच्यात या काळात एक प्रकारचे कृत्रिम द्वंद्वच निर्माण झाले होते. खरे तर मार्क्सवाद हा एक समग्र जीवनव्यूह आहे आणि या व्यूहातून साहित्याचे, साहित्य व समाजाच्या संबंधांचे आकलन व्हायला पाहिजे होते; पण साहित्याची समाजसन्मुखता एवढी एकच गोष्ट या काळात खंडनमंडन पद्धतीने खूप काळ चर्चिली गेली. परिणामी मराठी साहित्यविचाराला, समीक्षेला विविध विचारप्रवाहांचे संदर्भ जरी मिळाले असले तरी त्याचा फारसा उपयोग झाला नाही. ह. ना. आपटे व केशवसुतांनंतर बा. सी. मर्ढेकरांपर्यंत जो साहित्यविचार झाला त्याची तीन रूपे व. दि. कुलकर्णी (१९६६) यांनी दाखवली आहेत. ललित साहित्याचे प्रयोजन, ललित साहित्याचे स्वरूप व पारंपरिक साहित्यशास्त्र आणि नवटीकाशास्त्र यांचे संस्करण-समन्वय ही ती तीन रूपे होत; पण मुख्यत: या काळात सर्वाधिक चर्चा प्रयोजन विचाराचीच होती. या प्रयोजन विचाराच्याच संदर्भात वर उल्लेखिलेले 'कलावाद'






अनुक्रमणिका

व 'जीवनवाद' हे दोन प्रमुख पक्ष मराठीत होते.

वि. का. राजवाडे आणि कृ. प्र. खाडिलकर यांच्यापैकी राजवाडेंनी आपली भूमिका सविस्तर मांडली आहे. त्यांनी उत्तमोत्तम कादंबरीकारांसाठी जाज्वल्य मनोवृत्तीची आवश्यकता प्रतिपादिली आहे. खाडिलकरांनीसुद्धा सुशिक्षितांचा वर्ग राष्ट्रासाठी आहे, राष्ट्र सुशिक्षितांसाठी नाही, असे सांगताना सुशिक्षितांच्या जीवनध्येयाची स्पष्टोक्तीच दिली आहे. याच धारेत श्री. व्यं. केतकर येतात. सुंदर, भव्य व व्यापक वाङ्मयासाठी आपले सार्वजनिक आयुष्यसुद्धा व्यापक व भव्य झाले पाहिजे, असे ते म्हणतात तेव्हा, महान कलाकृतीची समाजसापेक्षताच ते व्यक्त करतात. राजवाडे, खाडिलकर व केतकर यांच्या मांडणीत कवी, काव्य व समाज हे परस्पराश्रयी आहेत. '...या विचारांत समाजसापेक्षता असली, तरी ह्या साहित्यशास्त्रीय विचाराला भक्कमपणे अशी समाजशास्त्रीय बैठक नाही.'[१] राजवाडेंनी जाज्वल्य मनोवृत्ती ही ईश्वरीय देणगी मानल्यामुळे, असे म्हणणे निराधार वाटत नाही. पेंडसेंचा कलाविषयक साचेबद्ध दृष्टिकोन दूर करून, व्यक्तिविकास आणि रूढ सामाजिक जाणिवा या दोहोंतील विरोधामुळे, संघर्षामुळे कलानिर्मिती होते, ही भूमिका पु. य. देशपांडे यांनी मांडली; पण प्रभाकर पाध्ये यांनी कलेची क्षितिजेमध्ये (१९४२) ही भूमिका अपूर्ण असल्याची खात्री केली. जीवन हे सामाजिक संघर्षापुरतेच मर्यादित नसते. रूढ समजुतींच्या स्वीकृतीनेसुद्धा जगाच्या प्रत्ययात नवी भर पडू शकते, असे पाध्ये म्हणतात. या काळात साहित्य वा कलेचे स्वातंत्र्य व पुरोगामी साहित्य हे समीक्षेच्या ऐरणीवरचे विषय होते. त्यात त्या वेळचे मातब्बर समीक्षकही तेवढ्याच हिरिरीने उतरले होते. पेंडसेंनी अभिजात वाङ्मय व उदात्त भावना यांचा अधिक्षेप करूनच पुरोगामी साहित्याची चर्चा केली. श्री. के. क्षीरसागरांनी या अधिक्षेपाला कडाडून विरोध केला. याचा परिणाम असा झाला की, मूळ पुरोगामी साहित्याची भूमिका बाजूला पडून ज्या नेत्याने ज्याच्या त्याच्या मर्जीप्रमाणेच आपापली कलामूल्ये लावत पुरोगामित्वाची चर्चा केली.[२] संत वाङ्मय हेच खरे पुरोगामी वाङ्मय, ही ल. रा. पांगारकरांची भूमिका पेंडसेंच्या

### चुकीची दुरुस्ती

संत नामदेव यांचा अंतकाळ ३ जुलै १३५० असा आहे. गेल्या अंकातील प्रा. भास्कर ढोके यांच्या 'संत कबीर : एक परिप्रेक्ष्य' या लेखात तो १३७५ असा चुकीचा छापला गेला आहे. तो दुरुस्त करून १३५० असा वाचावा.

भूमिकेचे दुसरे टोक होते, तर आचार्य जावडेकरांनी पुरोगामित्वाचा अर्थ अध्यात्मवादी जीवनसाफल्याच्या दृष्टीने लावला आणि ना. सी. फडकेंनी कलावादी जीवनसाफल्याच्या दृष्टीने चर्चा केली, असे व. दि. कुलकर्णी (१९६६) म्हणतात. अशा कोणत्याही वादात न पडता साने गुरुजींनी टॉलस्टॉयचा कला म्हणजे काय? हा ग्रंथ मराठीत अनुवादित केला. त्यांच्या प्रस्तावनेवर प्रचारकीपणाचा आरोप करण्यात येत असला तरी ही घटना अत्यंत महत्त्वाची आहे.

कोल्हटकरांचा कलावाद ते फडकेंची 'कलेसाठी कला' ही प्रचारकी भूमिका या कलावादी भूमिकेच्या विकासक्रमात मराठी तंत्रवादालाच जोरदार चालना मिळाली. कलेच्या विषयावरचे बंधनही सुटले. वरकरणी एकमेकांचे शत्रू म्हणून कलावाद व जीवनवाद एकमेकांसमोर उभे राहिले; पण मराठीत हे वादसुद्धा तात्त्विक पातळीवर एकमेकांचे कधीच विरोधी राहिले नाहीत. अनेकांनी अनेक प्रयोजने आपापल्या ठाम भूमिकेतून मांडली; पण या सर्वांचा एकत्रित विचार करून 'प्रयोजनांची अनेकता' या तत्त्वाचे व्यवस्थापन मराठीत होऊ शकले असते; पण तसे झाले नाही. या पार्श्वभूमीवर अभिनव काव्यप्रकाश(१९३०) या ग्रंथातून रा. श्री. जोगांनी भारतीय साहित्यशास्त्राचा जो सुबोध परिचय करून दिला व आवश्यक तेथे पाश्चात्य साहित्यशास्त्रातील संकल्पनांचीही जोड दिली, त्याचे मराठीच्या या व्याजमंथनकाळात अतिशय महत्त्व आहे. अर्थात जोगांनाही भारतीय साहित्यसिद्धान्तांचे यथार्थ आकलन करता आले, असेही नाही. द. के. केळकरांच्या काव्यालोचन(१९३१) मध्ये मुख्यत: रससिद्धान्ताचा विचार आहे व त्यात अर्वाचीन वाङ्मयातील प्रवृत्ती, पाश्चात्य साहित्यशास्त्र व अर्वाचीन मानसशास्त्राच्या आधारे रससिद्धान्ताची चर्चा केलेली असली तरी केळकरांची अभिव्यक्ती शास्त्रीय ग्रंथाला साजेशी उतरलेली नाही. १९२० ते ३० या कालखंडात रसव्यवस्थेची पुनर्रचना करण्याचा प्रयत्न न. चिं. केळकर, श्री. कृ. कोल्हटकर, श्री. ना. चापेकरांनी केला होता. के. ना. वाटवे यांनीही रसविमर्श (१९४२) या ग्रंथात रससिद्धान्त आणि रसव्यवस्थेची मानसशास्त्रीय दृष्टीने चर्चा केली. वाटवे यांना पौर्वात्य व पाश्चात्य साहित्यशास्त्राचा समन्वय साधून आधुनिक मराठी साहित्यशास्त्राची पाया आखणी करायची होती; पण ती यशस्वी झाली नाही. अर्वाचीन मराठी साहित्यविचार आणि समीक्षा ही ज्ञानविस्तारापासून सुरू झाली; पण या ह्या पंचाहत्तर वर्षांच्या कालावधीत मराठी समीक्षेने स्वत:ला कधी उत्क्रांत केले नाही. त्यामुळे मराठी







समीक्षेचा हा कालखंड व्याजमंथनकाळ असाच ओळखला पाहिजे.[६] रचनात्मक पद्धतीच्या विकासापासून मराठी समीक्षा वंचितच राहिली आहे.

१९व्या शतकातील वरवर संस्कृतनिष्ठ वाटणाऱ्या; पण प्राथमिक अवस्थेत असणाऱ्या समीक्षेवर थोडक्यात दृष्टिक्षेप टाकला, की या काळातील अलंकारचर्चा, रसचर्चा ही माहितीवजा होती; भारतीय साहित्यशास्त्रातील विविध सिद्धान्तांची पद्धतशीर चर्चा फारशी झाली नाही; साहित्याच्या निर्मितीबरोबर साहित्याच्या समीक्षेचा व्यवहारही अस्तित्वात येत असतो, ह्या न्यायाने इंग्रजी अमल व विद्येच्या प्रभावाखाली जी साहित्यनिर्मिती सुरू झाली, त्या अनुषंगाने मराठी समीक्षेवरील पाश्चात्त्य साहित्यविचाराचा प्रभावही पुष्कळ दाखवता येतो. १९२० ते ४५ या काळात साहित्य व कलेचे स्वातंत्र्य आणि पुरोगामी साहित्य हे समीक्षेच्या ऐरणीवरचे विषय दिसतात; पण वरकरणी एकमेकांचे शत्रू म्हणून उभे राहिलेले कलावाद व जीवनवाद हे अंतिमत: एकमेकांचे विरोधी नाहीत, असेही दिसून येते. प्रयोजनांचा एकसत्त्ववादी विचार करण्याच्या भरात या काळातील समीक्षेत काही अक्षम्य चुकाही घडल्या. अर्थात, मराठी समीक्षेचा हा व्याजमंथनकाळच आहे. तिचा रचनात्मक असा विकास झाला नाही. केवळ वादासाठी वाद असे तिचे स्वरूप राहिले. केशवसुतांच्या कवितेने तथाकथित समीक्षासूत्र मराठी समीक्षेला सांगण्याचा प्रयत्न केला खरा; पण संकल्पनाविचाराचा अभाव यामुळे ती स्वत: निर्माण केलेल्या आवर्तातच फिरत राहिली असे म्हणता येते.

●

संदर्भ सूची :


१. डहाके वसंत आबाजी: आमुख, संपा.गणोरकर प्रभा व इतर, वाङ्मयीन संज्ञा- संकल्पना कोश, ग.रा.फाऊण्डेशन, मुंबई २००१, पृ.१३,१४
२. राजवाडे वि.का. : राजवाडे लेखसंग्रह, संपा. लक्ष्मणशास्त्री जोशी, साहित्य अकादमी व पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, दुसरी आवृत्ती.१९६७, पृ.२८०
३. तत्रैव: पृ.२८६
४. तत्रैव: पृ.२९६
५. कुलकर्णी व. दि. : मर्ढेकरपूर्वकालीन मराठी टीका, संपा. दावतर वसंत, मराठी टीका, इंडियन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम,' मुंबई, १९६६, पृ.१८
६. तत्रैव: पृ.१९
७. तत्रैव: पृ.२१
८. तत्रैव: पृ.२९









अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

डॉ. नागनाथ कोत्तापल्ले

# खेळ : लक्षणीय कथासंग्रह

एकाच बीजाचा अगर अनुभवाचा विविध परिमाणांनी शोध घेणे ही अनेक कवी लेखकांसाठी आवडीची तशीच आव्हानात्मक गोष्ट असते. यातूनच 'आई', 'वडील', 'शिवार' यांसारख्या अनुभवांवर आज अनेक कवी कविता लिहित आहेत. अरविंद गोखले यांचा 'नजराना'सारखा संपूर्ण कथासंग्रह हा वेश्यांच्या जीवनाचे विविधांगी दर्शन घडविणारा आहे. वेश्यांचे होणारे शोषण, त्यांची होणारी घुसमट, त्यातूनही वाट्याला येणारे काही सुखाचे क्षण, अशा विविध अनुभवांचे दर्शन या कथासंग्रहातून घडते. म्हणजे वेश्या जीवन येथे साऱ्याच कथांच्या केंद्रस्थानी आहे; परंतु प्रत्येक कथेतील अनुभव वेगळा आहे. अशा कथा लिहित असताना अनुभवाची पुनरावृत्ती होणार नाही, याची काळजी लेखकाला घ्यावी लागते. तसेच सहानुभतीच्या पलीकडे जाऊन तटस्थपणे चित्रण करावे लागते, आणि लेखकांच्या संदर्भातील हे मोठे आव्हान असते.

असेच एक आव्हान प्रा. मिलिंद जोशी यांनी आपल्या 'खेळ' या कथासंग्रहातून पेलले आहे. कामजीवनातील विविध अनुभव ते या कथांमधून प्रकट करतात. म्हणजे मानवी कामजीवन हे येथे केंद्रस्थानी आहे. त्यातून घडणारे स्त्रीपुरुष संबंध हे प्रा. मिलिंद जोशी यांच्या चिंतनाच्या परिघात येतात आणि त्यातून कथांचा जन्म होत जातो.

माणसाचे कामजीवन अनाकलनीय आहे. या कामजीवनाला नियंत्रित करण्यासाठी समाजाने विवाह संस्था आणली. अनेक कायदे केले. रूढी परंपरांचा डोलारा उभारला. असंख्य नीतिकथा निर्माण केल्या. संस्कारांचे मखर उभे केले. तरीही ही कामप्रेरणा नियंत्रित होतेच असे नाही. ती पुष्कळशी गूढ असते, तसेच ती सामाजिक बंधनांची प्रतिक्रियाही असते. एकंदरीत कामप्रेरणा ही अनाकलनीय तर असतेच; पण त्याच वेळी ती प्रमाथीही असते. एखाद्या अनाकलनीय प्रपातासारखी असते. ती सगळ्या नीतिकल्पनांचा धुव्वा उडवीत प्रवाही व्हायला लागते तेव्हा त्यात मानवी जीवनाच्या विनाशाची बिजेही दडलेली असतात.

'खेळ' या संग्रहातील 'अमृत महोत्सव' ही कथा सोडली; तर बाकी सर्व कथा कामप्रेरणेचे प्रमाथी रूप दर्शविणाऱ्या आहेत.

या संग्रहातील सर्वच कथा उच्चभ्रू तसेच मध्यमवर्गीय जीवनाचे चित्रण करताना दिसतात. याची नोंद यासाठी करावयाची की, साधारणतः समाजाच्या खालच्या स्तरात सैल कामजीवन असते, असा मराठीतील अनेक लेखकांचा समज आहे. त्या दृष्टीने मराठीत असंख्य कलाकृती निर्माण झाल्या आहेत. त्या चांगल्याही आहेत. त्यात काही प्रयोगही केले गेले आहेत. त्यामुळे अशा कलाकृतींची व्यापक चर्चाही झालेली आहे. 'वासुनाका', 'चक्र', 'माहिमची खाडी', 'तो आणि त्याचा बाप' अशा काही कलाकृतींचा या संदर्भात निर्देश करता येईल; परंतु प्रमाथी कामप्रेरणा आणि समाजाला मान्य नसणारे स्त्री पुरुष संबंध हे समाजाच्या सर्वच स्तरांत असतात, याची जाणीव प्रा. मिलिंद जोशी यांच्या 'खेळ'मधील कथा वाचताना प्रकर्षाने होते. म्हणून त्यांच्या कथांमधील वातावरण आणि व्यक्ती या उच्चभ्रू, आर्थिक दृष्टीने समृद्ध, तसेच मध्यमवर्गीय जीवनातील आहेत, याचा निर्देश केला, तो एवढ्याचसाठी. दुसरी गोष्ट म्हणजे मध्यमवर्गीय जीवनाकडे पाहण्याची लेखकाची दृष्टी मध्यमवर्गीय नाही. म्हणजे उच्चभ्रू किंवा मध्यमवर्गीय जीवनाबद्दल मिलिंद जोशी पक्षपाती नाहीत. त्यामुळेच त्यांची कथा मानवी जीवनाचा शोध घेण्यात














अनुक्रमणिका

**"या संग्रहातील सर्वच कथा उच्चभ्रू तसेच मध्यमवर्गीय जीवनाचे चित्रण करताना दिसतात. याची नोंद यासाठी करावयाची की, साधारणतः समाजाच्या खालच्या स्तरात सैल कामजीवन असते, असा मराठीतील अनेक लेखकांचा समज आहे. त्या दृष्टीने मराठीत असंख्य कलाकृती निर्माण झाल्या आहेत. त्या चांगल्याही आहेत. त्यात काही प्रयोगही केले गेले आहेत. त्यामुळे अशा कलाकृतींची व्यापक चर्चाही झालेली आहे. 'वासुनाका', 'चक्र', 'माहिमची खाडी', 'तो आणि त्याचा बाप' अशा काही कलाकृतींचा या संदर्भात निर्देश करता येईल; परंतु प्रमाथी कामप्रेरणा आणि समाजाला मान्य नसणारे स्त्री पुरुष संबंध हे समाजाच्या सर्वच स्तरांत असतात, याची जाणीव प्रा. मिलिंद जोशी यांच्या 'खेळ'मधील कथा वाचताना प्रकर्षाने होते. म्हणून त्यांच्या कथांमधील वातावरण आणि व्यक्ती या उच्चभ्रू, आर्थिक दृष्टीने समृद्ध, तसेच मध्यमवर्गीय जीवनातील आहेत, याचा निर्देश केला, तो एवढ्याचसाठी. दुसरी गोष्ट म्हणजे मध्यमवर्गीय जीवनाकडे पाहण्याची लेखकाची दृष्टी मध्यमवर्गीय नाही. म्हणजे उच्चभ्रू किंवा मध्यमवर्गीय जीवनाबद्दल मिलिंद जोशी पक्षपाती नाहीत. त्यामुळेच त्यांची कथा मानवी जीवनाचा शोध घेण्यात यशस्वी झाली आहे असे म्हणता येईल."**

यशस्वी झाली आहे असे म्हणता येईल.

'खेळ' या संग्रहातील पहिल्या तीन कथांचा (खेळ १,२,३) या संदर्भात विचार करता येऊ शकतो. वस्तुतः या तीन कथा म्हणजे नम्रताच्या जीवनावरील एकच दीर्घ कथा आहे. नम्रता उच्चविद्याविभूषित देखणी प्रौढा आहे. तिला एक मुलगीही आहे. तिने अनय या कर्तबगार व्यक्तीशी प्रेमविवाह केलेला आहे. तोही मोठी कंपनी चालवितो आहे. म्हणजे वरकरणी सुखाचा संसार आहे. कुठे कसली कमतरता नाही. तरीही नवऱ्याच्या कंपनीतील भागीदार असलेल्या रमेशच्या प्रेमात पडते. त्याच्याबरोबर प्रवासाला जाण्याची संधी शोधत राहते. केवळ त्याला आवडते म्हणून जिन्समध्ये वावरायला लागते. म्हणजे त्याच्या नजरेत भरण्याचा प्रयत्न करीत राहते. एवढेच नाही तर त्याला आवाहन करणारे एसएमएस करीत राहते; परंतु रमेश मात्र या सगळ्या गोष्टींना प्रतिसाद देत नाही. घरी यायचेच तो थांबवतो; परंतु एवढ्यावरच ती थांबत नाही. त्यानंतर ती मिहिरच्या प्रेमात पडते. मिहिर कवी आहे. खूप मोकळा आहे. तोही तिच्यावर प्रेम करीत राहतो; परंतु ती मात्र त्याला खेळवत राहते. असा खेळ करण्यात तिला विलक्षण आनंद होत राहतो. हा खेळ मिहिरला प्रथमतः समजत नाही. तो तिच्या देहाची अपेक्षा करतो. त्याला मात्र ती प्रतिसाद देत नाही. वरून भोळाभाबडा दिसणारा तिचा चेहरा आतून मात्र भीतिदायक असल्याचा त्याला अनुभव येतो. परिणामी तो तिच्या आयुष्यातून बाजूला होतो.

एव्हाना ती आणखी काही वर्षांनी मोठी झालेली आहे. सारी संसारसुखे उपभोगते आहे. नवऱ्याबरोबर एका खेड्यात काही कामानिमित्त जाते. तेथे ती कुठल्या तरी सांस्कृतिक वर्तुळात काम करीत राहते. आपल्याला वाटते की, आता ती सुखाने नवऱ्याबरोबर संसार करू लागलेली असेल; पण तसे होत नाही. त्या सांस्कृतिक वर्तुळात काम करणाऱ्या लालासाहेब आणि विद्याताई यांच्या संपर्कात येते. हे दोघेही देखणे. सर्वार्थाने सुखी. कुठली काही कमतरता नाही. एकदा मात्र नम्रता रविवारी लालासाहेबांच्या कार्यालयात भेटावयास जाते. ते तिला सारे कार्यालय दाखवतात. शेवटी अत्यंत सुंदर अशा अँटी चेंबरमध्ये घेऊन जातात. ते आत जातात आणि चेंबरचे दार बंद होते. त्यासरशी ती म्हणते की, ''कुणी पाहील ना?'' तिचे हे वाक्य अत्यंत सूचक आहे. त्याचा नेमका अर्थ लक्षात घेऊन लालासाहेब पुढे होतात आणि नम्रता त्यांच्या मिठीत विसावते. हा एक नवाच खेळ तिने खेळून पाहिलेला आहे.

येथे अनेक प्रश्न निर्माण होतात. स्वतःचा संसार असताना ती रमेशला जाळ्यात ओढण्याचा प्रयत्न का करते? मिहिरला खेळवण्यामध्ये तिला कोणता आनंद मिळतो? आणि लालासाहेब स्वतः सुखी असताना तिच्याशी सहजपणे का रत होतात? की वरकरणी सुखी असणारे लालासाहेब सुखी नाहीतच की काय? नम्रताही आपल्या संसारात सुखी नाही का? की सारी सुखे असूनही माणसे काम व्यवहाराच्या संदर्भात असेच वागतात का? हे आणि यांसारखे असंख्य प्रश्न या कथा वाचल्यानंतर निर्माण होतात. मनःशांती केंद्रात गेल्यावर नम्रताला हे आपण का करतो आहोत, हे योग्य नाही असे भान येते, असे लेखक दर्शवितो. तरीही ती पूर्वी असे वागत होती. त्यामागील प्रेरणा नेमक्या कोणत्या होत्या? हा प्रश्न उरतोच.

याचा अर्थ असा, की समाजातल्या कुठल्याही स्त्री-पुरुष संबंधाचा अर्थ लावणे कठीण असते. उच्चभ्रू, श्रीमंत आणि वरकरणी संसुस्कृत असल्याचे दर्शविणारे जग अशा प्रकारे पोखरलेले असू शकते, हेच येथे लक्षात येते.

उपरोक्त कथा शहरी परिसरात घडत असाव्यात असे दिसते; परंतु 'वाडा', 'झोपाळा'सारख्या कथा मात्र खेड्यात घडताना दिसतात. 'वाडा' या कथेतील अनंता त्याच्या घराचा एकमेव वारसदार उरलेला आहे. आज तो शहरात येऊन स्थिर झालेला असला तरी त्याचा गावात मोठा वाडा

आहे. तो विकावयाचा आहे, म्हणून खेड्यात येतो. तात्यासाहेबांच्या घरी थांबतो. त्याला अनेक प्रश्न पडलेले आहेत. श्रीमंत आणि सुखाने नांदणारे घर एकाएकी का नामशेष होते? अनंताचा मोठा भाऊ लग्नानंतर तीन-चार महिन्यांनीच का आत्महत्या करतो? त्याची बायकोही का आत्महत्या करते? वाड्यात राहणाऱ्या त्याच्या काकाच्या बायकोनेही आत्महत्या केलेली असते, असे का झाले? असे प्रश्न अनंताच्या मनात निर्माण होतात. या प्रश्नांची उत्तरे तो तात्यासाहेबांकडून काढून घेतो. तेव्हा त्याच्या लक्षात येते की, त्याचा पम्याकाकाच या साऱ्यांना कारण आहे. त्याच्या अफाट आणि बेबंद वासनेने त्याच्या बायकोचा बळी घेतला. एवढेच नाही तर अनंताच्या भावाचा आणि त्याच्या बायकोचाही बळी घेतला.

पम्याकाका असा असेल अशी त्याने कधी कल्पानाही केलेली नव्हती; परंतु हे वास्तव होते. एवढेच नव्हे तर अनंताच्या वडिलांनी पत्नीच्या आजारपणात काळजी घेण्यासाठी तिच्या बहिणीला बोलावून घेतले होते. तिच्यावरही पम्याकाकाने बलात्कार केला, आणि त्यातूनच अनंताचा जन्म झाला. हे जन्मरहस्य जेव्हा अनंताला कळते तेव्हा तो पुरता उद्ध्वस्त होऊन जातो. आतापर्यंत ज्याला आपण बाप समजत होतो, तो आपला बाप नव्हे, एवढेच काय आपला जन्मही बलात्कारातून झाला आहे, हे भीषण वास्तव त्याच्या लक्षात येते. तो कोलमडून पडतो.

भव्य चिरेबंदी वाड्यांमधील एक वेगळे सत्य मिलिंद जोशी प्रकट करतात. वरकरणी प्रतिष्ठित असणारी घराणी अशी वासना विकारांनी पोखरून निघालेली असू शकतात, हे पूर्ण उत्कटपणे येथे व्यक्त होते. हा वाडा खेड्यातील, सरंजामी व्यवस्थेतील अवशेषरूप आहे.

'झोपाळा' ही कथाही अशाच वाड्यात घडणारी. या कथेतील अनंता शहरात राहतो. त्याच्या बायकोने आणि मुलीने झोपाळ्याचा हट्ट केला, तेव्हा तो आकांडतांडव करतो कारण 'झोपाळा' या वस्तूशी त्याचे शोकात्म बालपण बांधले गेलेले आहे. त्याच्या आईला वेड लागलेले आहे. असा साऱ्यांचा समज आहे. ती दिवसभर झोपून असते आणि रात्री उठून सारे व्यवहार करते. मुख्य म्हणजे घरातल्या झोपळ्यावर बसून झुलत राहते. थकेपर्यंत. शेवटी तिचा झोका एवढा उंच जातो की, तिचे डोके वरच्या माळवदाला लागून तिचा मृत्यू होतो. ही त्याच्या आयुष्यातील अत्यंत दुखरी आठवण.

परंतु त्याला जाण आल्यानंतर तो आईच्या वर्तनाचा अन्वयार्थ लावतो. तिचे दुःख कोणते, तर तिचा नवरा कर्तृत्वशून्य, मुखदुर्बळ, बापडा तर आहेच; पण आईच्या ताटाखालचे मांजर आहे. ती किती तरी स्वप्न पाहत या वाड्यात आली असेल; परंतु इथले वास्तव मात्र तिला समजून न घेणारे. यातूनच तिचा मानसिक तोल ढळतो.

म्हणजे वाड्याच्या चिरेबंदी भिंतीआड एखाद्या स्वप्नाळू स्त्रीची काय अवस्था होऊ शकते याचे येथे फार कारुण्यपूर्ण चित्रण आले आहे. येथील नवरा कामदृष्ट्या सक्षम असेलही; परंतु त्याचे वर्णन मात्र पुरुषी प्रतिमेत न बसणारे. हेच दुःख असेल का, अनंताच्या आईचे? की पुरुष म्हणूनही तो सक्षम नाही? असाही प्रश्न उपस्थित होतो.

या कथेमध्ये 'झोपाळा' अनेक अर्थांनी प्रतीकात्म होऊन जातो. विशेषतः अनंताच्या आईच्या स्वप्नांचे प्रतीक होऊन जातो. तसेच या कथेतील आईची व्यक्तिरेखाही मोठी ठसठशीत होऊन प्रकट होते.

'वाडा' आणि 'झोपाळा' या दोन्ही कथा खेड्यात घडणाऱ्या. उच्चभ्रू व श्रीमंत वसाहतीतल्या वाड्यांमध्ये घडणाऱ्या. एका अर्थाने 'वाड्यां'नासुद्धा प्रतीकात्म रूप प्राप्त होऊन जाते. हे वाडे म्हणजे सरंजामी परंपरांचे अवशेष. म्हणजे सरंजामी जगणे असो, की आधुनिक जगणे असो स्त्रीपुरुष संबंध अनाकलनीय, गूढ आणि तर्काच्या पलीकडचे असतात याची प्रतीती मिलिंद जोशी यांनी प्रभावीपणे करून दिली आहे.

या दोन्ही कथांचा आणखी एक विशेष म्हणजे वाडा संस्कृतीची मिलिंद जोशी यांना सखोल जाणीव आहे. खरे म्हणजे या दोन कथांवरती एक उत्तम कादंबरी लेखकाला लिहिता येऊ शकेल.

'भोगिले जे दुःख त्याला', 'तीन पक्षी' आणि 'अधांतरी' या कथांमधला अनुभव शहरांमधला आणि आधुनिक जीवनशैली जगणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या संदर्भातला.

आधुनिक जीवनशैली यासाठी म्हणावयाचे की, आधुनिकतेबरोबर काही मूल्ये आली. त्यातील मुख्य मूल्य म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य. स्त्री स्वातंत्र्य. मध्ययुगात स्त्री घराबाहेर पडत नव्हती. पडू दिले जात नव्हते. ती शिकत नव्हती. म्हणजे तिला शिकू दिले जात नव्हते. तिच्यावर सतत संशय व्यक्त केला जात होता. प्रसंगी तिच्यावर करडी नजर असायची. हे सारे आधुनिक मूल्ये आल्याबरोबर बदलले. स्त्री शिकू लागली. स्वतंत्रपणे अर्थार्जन करू लागली. तिच्यावर सततचा अविश्वास दाखवणे थांबले. हे सारे चांगलेच झाले; परंतु कामजीवन नावाची गोष्ट कशी वळणे घेईल ते सांगता येत नाही. मध्ययुगाचे अवशेष असलेल्या वाड्यांमधून काय घडलेले होते, घडू शकत होते

> विवाहाशिवाय राहणे म्हणजे मित्रांसारखे राहणे. कोणाचा कोणावर दबाव नसतो; परंतु ती मित्राकडे राहायला जाते आणि तिला वेगळेच अनुभव यायला लागतात. आतापर्यंत मित्रासारखा वागणारा माणूस चक्क नवरेगिरी गाजवायला लागतो. तिच्यावर पत्नीसारखी बंधने घालायला लागतो. हे त्याचे वेगळे रूप म्हणजे हजारो वर्षे मुरलेल्या परंपरांचा परिपाक असतो. म्हणजे ज्या परंपरांच्या दबावातून तिला सुटका हवी होती, त्या परंपरा वेगळ्या रूपात तिचा पाठलाग करतातच. शेवटी ती घर सोडण्याचा निर्णय घेते. ती परत निघाली तेव्हा 'तू का जातेस' असेही त्याने विचारले नाही. याचेच तिला सर्वाधिक दुःख होते. याचा अर्थ असा, की तो त्याच्यातील पारंपरिक पुरुष प्रतिमेला विसरू शकत नाही, आणि हे तिचे खरे दुःख आहे. येथे कामप्रेरणांना मिळणारे अमानुष स्वरूप लक्षात येते.

याचा अनुभव 'वाडा' आणि 'झोपाळा' या कथांमधून आलाच आहे. आधुनिक जीवन व्यवहार रुजल्यानंतरचे काम व्यवहार उपरिनिर्दिष्ट तीन कथांमधून व्यक्त झाले आहेत. म्हणजे काळ कुठलाही असो, संस्कृती कुठलीही असो, मानवी कामजीवन अनाकलनीय, तर्कातीत आणि गूढ असेच असते. हाच अनुभव मिलिंद जोशी त्यांच्या इतर कथांमधून प्रकट करतात. त्यांपैकी 'अधांतरी' ही एक कथा आहे.

भारतीय मनावर परंपरांचे दडपण खूपच असते. त्यातही स्त्रिया या दडपणाखाली पिचून जातात. मग कधी कधी ही सारी दडपणे झुगारुन द्यावीत असे वाटते. या कथेमधील 'ती' अशीच परंपरांचे ओझे झुगारून देणारी. एकटी राहणारी. ती आणखी एक पाऊल पुढे टाकते आणि विवाहाशिवाय एका मित्राबरोबर राहायला लागते.

विवाहाशिवाय राहणे म्हणजे मित्रांसारखे राहणे. कोणाचा कोणावर दबाव नसतो; परंतु ती मित्राकडे राहायला जाते आणि तिला वेगळेच अनुभव यायला लागतात. आतापर्यंत मित्रासारखा वागणारा माणूस चक्क नवरेगिरी गाजवायला लागतो. तिच्यावर पत्नीसारखी बंधने घालायला लागतो. हे त्याचे वेगळे रूप म्हणजे हजारो वर्षे मुरलेल्या परंपरांचा परिपाक असतो. म्हणजे ज्या परंपरांच्या दबावातून तिला सुटका हवी होती, त्या परंपरा वेगळ्या रूपात तिचा पाठलाग करतातच. शेवटी ती घर सोडण्याचा निर्णय घेते. ती परत निघाली तेव्हा 'तू का जातेस' असेही त्याने विचारले नाही. याचेच तिला सर्वाधिक दुःख होते. याचा अर्थ असा, की तो त्याच्यातील पारंपरिक पुरुष प्रतिमेला विसरू शकत नाही, आणि हे तिचे खरे दुःख आहे. येथे कामप्रेरणांना मिळणारे अमानुष स्वरूप लक्षात येते.

विवाहाशिवाय राहणे ही आधुनिक काळातील कल्पना; परंतु स्त्रीपुरुषांवरील पारंपरिक संस्कार जागे होतात आणि नात्यांमध्ये ताण निर्माण होतात. हा अनुभव कमालीचा दुःखकारक असतो याचीच प्रतीती ही कथा वाचून येते.

घरात तीनच व्यक्ती असूनही ते मनाने परस्परांपासून किती दूर असू शकतात याचा अनुभव 'तीन पक्षी' या कथेतून येतो. दुय्यम दर्जाची कलावंत तरीही कमालीची अहंकारी स्त्री नवऱ्याला सतत कस्पटासमान वागवीत राहते. एवढेच नाही, तर उघडउघड एका कमी वयाच्या पुरुषाशी संबंध प्रस्थापित करते. मुलाला हे काही आवडत नाही; परंतु त्याची सहानुभूती मात्र बापाच्या बाजूने आहे. याचे एक कारण यातील नवरा आपल्या बायकोची कामतृप्ती करू शकत नाही. कामतृप्ती न करू शकणारा नवरा, वासनातृप्तीसाठी काहीही करू पाहणारी स्त्री आणि त्यांचा एकुलता एक असहाय मुलगा यांची ही कथा एकीकडे उन्मत्त कामप्रेरणेचे जसे चित्रण करते, तसेच अशा घरात वाढणाऱ्या असहाय मुलाचे करुणाजनक चित्र रेखाटते. त्यामुळे ही एक लक्षणीय कथा झाली आहे.

'भोगिले जे दुःख त्याला' ही आगळीवेगळी कथा. विवाहित स्त्रीपुरुष आपापल्या सहचरांना सोडून एकत्र राहायला लागतात तेव्हा दोन्ही कुटुंबामध्ये तणाव निर्माण होतो; परंतु येथील सदानंद आणि प्रतिमा मात्र कोणाचीही पर्वा न करता एकत्र राहतात. सगळे कळूनही सदानंदची बायको त्याच्याजवळच राहते. तडजोड म्हणून; पण त्यांच्यातील पतिपत्नीचे नाते संपले आहे.

कथेचा प्रारंभ प्रतिमाचा मृत्यू होतो आणि सदानंद आपल्या पत्नीला हॉस्पिटलध्ये बोलावतो येथून होतो. सदानंदच्या सांगण्याप्रमाणे त्याची बायको प्रतिमाच्या अंत्यविधीचे काही उपचार करते. त्या वेळी तिची झालेली विदीर्ण अवस्था आणि एवढे सगळे घडूनही तिच्या मुलीला बापाचीच काळजी वाटते यामुळे तिचे अस्वस्थ होणे कथाकाराने फार प्रभावी रीतीने चित्रिले आहे. त्यातून मानवी नातेसंबंधांची अनाकलनीयताही प्रकटून जाते. त्यामुळे कथा बहुपरिणामी होऊन तिला एक वेगळी उंची प्राप्त होते.

उपरोक्त निर्देशिलेल्या साऱ्या कथांचा केंद्रबिंदू किंवा मुख्य अनुभव केंद्र मानवी जीवनातील कामप्रेरणा आहे. माणसे खेड्यातील असोत की शहरातील, सरंजामी वारसा सांगणारी असोत की आधुनिक काळातील असोत, जेथे





अनुक्रमणिका

कोठे माणूस असेल तेथे कामप्रेरणा असतातच आणि त्या अनाकलनीय, गूढ तर्कातीत अशा असतात याची जाणीव कथाकार मिलिंद जोशी प्रकट करतात. कामप्रेरणांमधील गुंतागुंत, भोवतीच्या व्यवस्थेचा रेटा आणि त्यातून माणसांची होणारी ससेहोलपट मिलिंद जोशी फार प्रभावीपणे प्रकट करतात.

कामजीवनाशी संबंधित अनुभव प्रकट करीत असताना फार काळजी घ्यावी लागते कारण अशा अनुभव प्रकट करणाऱ्या कथा कधी स्वप्नरंजनाच्या वाटेने अगर भडकपणाच्या वाटेने जायला लागतील ते सांगता येत नाही. पुष्कळदा अशा कथा लेखकाच्या रंजनाचे विषयही होऊ शकतात. असे सगळेच धोके कथाकाराने टाळले आहेत. याचा अर्थ असा, की त्या त्या अनुभवाकडे लेखकाने तटस्थपणे पाहिले आहे आणि त्याची संयमित अभिव्यक्ती केली आहे.

साठ-सत्तर वर्षांपूर्वीचा लेखक आणि आजचा लेखक यात सामाजिक बदलाचा मोठा पट आहे. आज लेखकाच्या भोवती जीवनाच्या आणि साहित्याच्या क्षेत्रात आलेल्या अनेक वादांची जाणीव आहे. विशेषतः फ्रॉईडने स्त्रीपुरुषांच्या मानसशास्त्रासंबंधी जे विवेचन केले आहे ते त्याच्या बहुधा परिचयाचे असते. मानवी कामजीवनाबद्दल त्याने जे चिंतन केलेले आहे, ते आजच्या लेखकाला माहीत असण्याची शक्यता असते. विशेषतः कामजीवनातील अतार्किकता आणि मानवी संज्ञा याची जाणीव लेखकाला असते. तसेच १९७० नंतर मराठी साहित्यात जे प्रवाह निर्माण झाले त्याचे परिणामही एकूणच साहित्य जगतावर झाले. हे सारे विवेचन यासाठी करावयाचे की, प्रमाथी कामजीवनाचे चित्रण करताना मिलिंद जोशी कुठलीही बोधपर, नीतिपर भूमिका घेत नाहीत. जीवन हे असे आहे, अशी ते सरळ सरळ भूमिका घेतात. म्हणूनच त्यातील सुक्ष्मातिसूक्ष्म ताणतणाव ते समर्थपणे प्रकट करू शकले आहेत.

या संग्रहामध्ये आणखी दोन काहीशा वेगळ्या कथा आहेत. त्या कामजीवनाशी सरळपणे संबंधित आहेत, असे म्हणता येत नाही; पण सांसारिक जीवनाचा अनुभव प्रकट करणाऱ्या मात्र या कथा आहेत.

'अमृत महोत्सव' ही कथा मामलेदार पती असलेल्या व सधन घर असलेल्या स्त्रीच्या दबलेपणाची कथा आहे. नवरा जिवंत असेपर्यंत घरातही साहेबी थाटात वागतो. पत्नीला फारसे समजून घेत नाही. त्यांची मुलगीही बापावरच गेली आहे. तिचे लग्नही श्रीमंत व्यक्तीशी होते आणि तिला दाखवेखोरीची मोठीच हौस आहे. परिणामी आयुष्यभर दबून राहिलेली बाई मनाने मुलीपासूनही दूर जाते. मुलीने आईच्या अमृत महोत्सवाचा कार्यक्रम आयोजित केला आहे. सगळा थाटमाट तिला करावयाचा आहे; परंतु आईपुढे प्रश्न असा निर्माण होतो, की हे जे सारे मुलगी करते आहे, ते प्रेमातून करते आहे की, तिच्या श्रीमंतीच्या प्रदर्शनासाठी करते आहे. शेवटी हे सारे प्रदर्शनासाठी चालू आहे, असे लक्षात आल्यावर ती ठाम नकार देते. मुलीचा हिरमोड करते. त्या बाईची ही काहीशी कठोर कृती म्हणजे आयुष्यभरात तिला जे दाबून टाकण्यात आले आहे, त्याविरुद्धची ही एक बंडखोरीची कृती आहे.

मानवी अंतर्मनाच्या संज्ञेची फार चांगली जाण कथाकार येथे दाखवतो. म्हणूनच ही एक लक्षणीय कथा झाली आहे.

'लग्न कल्लोळ' ही अशीच एक वेगळा अनुभव साकारणारी कथा आहे. नव्या काळामध्ये स्त्रियांना त्यांचे स्वतःचे व्यक्तिमत्त्व प्राप्त होऊ लागले आहे. त्यातून समाजजीवनात काही ताण निर्माण होत आहेत. स्त्रियांच्या आकांक्षा वाढल्यामुळे विवाहाबद्दल त्या जागरूक झालेल्या आहेत. त्यामुळेच शेती करणारा नवरा नको म्हणणाऱ्या मुली आज आपण पाहतो आहोत. 'लग्न कल्लोळ'मधील तरुणी मात्र भटजीशी लग्न नको म्हणून लग्नाआधी काही तास लग्न मोडून टाकते. नव्या काळात अनेक ताण निर्माण झाले आहेत, त्यांपैकी एक ताण या कथेतून प्रकट होतो. लग्नघराची गडबड, धावपळ, ऐनवेळी वधूचा नकार आणि नवी मुलगी शोधून लग्न लावणे या साऱ्याच घटनांमधून ही कथा साकार होत जाते. अशा कठीण प्रसंगी जेष्ठांच्या अंतर्मनाचे अनेकविध रंग कथाकाराने साकार केलेले आहेत.

मिलिंद जोशी यांच्या आणखी एका वैशिष्ट्याची नोंद केली पाहिजे. ते वैशिष्ट्य म्हणजे कथा या वाङ्मय प्रकाराचे वेगळेपण त्यांना माहीत आहे, तसेच एखादी वास्तू रेखीवपणे उभी करावी तसा त्यांच्या कथेचा घाट असतो. त्यामुळेही त्यांची कथा प्रत्ययकारी होते.

एकंदरीत मानवी व्यवहाराचे आणि अंतर्मनाचे सूक्ष्म आकलन, कथेच्या रूपासंबंधीची समज, ठसठशीत व्यक्तिरेखा, कथावस्तू नेटकेपणाने साकारणारी वातावरण निर्मिती, अनुभवाला साजेशी भाषाशैली यामुळे 'खेळ' हा एक लक्षणीय आणि वेगळ्या अनुभवाला साकारणारा समर्थ कथासंग्रह आहे, असे म्हणता येईल.

●



लेख

डॉ. मेधा सिधये

# अध्यात्मप्रवण, आत्मप्रत्ययी तत्त्वचिंतक : प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख

■■

मराठी साहित्यातले ख्यातकीर्त कादंबरीकार प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्ताने डॉ. मेधा सिधये यांनी त्यांच्या साहित्याचा आणि व्यक्तिमत्त्वाचा घेतलेला

■■



**प्रा.** त्र्यंबक विनायक सरदेशमुख या, मराठी साहित्यसमीक्षेत वेगळ्या भाव-विचाराने दीर्घकाळ संचार केलेल्या, लेखकाचे हे जन्म-शताब्दी वर्ष. (जन्म २२ नोव्हें. १९१९, निधन १२ डिसें. २००५) त्यानिमित्ताने त्यांच्या साहित्य-निर्मितीचे हे कृतज्ञ स्मरण.

शहाऐंशी वर्षांच्या आयुर्मर्यादेत सुमारे पंच्याहत्तर वर्षे त्यांनी साहित्य-वाचन, चिंतन आणि लेखनात व्यतीत केली. कादंबरीकार आणि समीक्षक म्हणून त्यांची कामगिरी विशेष मोलाची आहे. काही मोजक्या कथा, कविता, आत्मवृत्तपर लेख नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले. सत्यकथा, आशय, अभिरुची, छंद, युगवाणी, अक्षरवैदर्भ, वाङ्मयशोभा, अबकडई, मनोहर, ऋतुरंग ही काही नावे.

'ससेमिरा' ही त्यांची पहिली कादंबरी १९४४मध्ये प्रकाशित झाली. पात्रमुखी निवेदनात्मक पद्धतीच्या या कादंबरीतील नवखेपणा त्यांना स्वतःलाच जाणवला. 'बखर एका राजाची' (१९७२), 'उच्छाद' (१९७८) आणि 'डांगोरा एका नगरीचा' (१९९८) ('डांगोरा'चे नाव आधी 'मूर्च्छा' असे ठरविले होते.) या त्यांच्या कादंबऱ्या. 'उच्छाद' व 'डांगोरा'ला राज्यपुरस्कार, 'डांगोरा'ला शिवाय कोठावळे पुरस्कार आणि साहित्य अकादमी पुरस्कार प्राप्त झाले. 'डांगोरा'ला 'बखर'ची पार्श्वभूमी आहे आणि 'उच्छाद'चा धागा 'डांगोरा'त असला तरी ती 'डांगोरा'च्या आधी लिहिली आहे. या कादंबरीत्रयीने सरदेशमुखांना समर्थ कादंबरीकार म्हणून नाव मिळाले. आपल्या या कादंबरीलेखनाविषयी त्यांनी स्वतः जे म्हटले आहे, त्यावरून त्यांची लेखनधारणा ध्यानी यावी. ते म्हणतात, 'माझ्या तीनही कादंबऱ्यांतून व्यक्तिगत तशी सामूहिक संसारदुःखाची गाथा उघडून ठेवण्याचा प्रयत्न मी केला आहे. या दुःखाला छेद द्यायला व तो सहन करायला सद्भाव आणि सामंजस्य यांहून काहीही सक्षम नाही हे प्रसंगाप्रसंगातून आणि विविध व्यक्तिदर्शनातून प्रकट व्हावे असा आंतरिक हेतू मी बाळगला. ('बखर', 'डांगोरा', 'उच्छाद', 'एक भूमिका' पृ. २५, 'आशय' दिवाळी १९९८)

'अंधारयात्रा' (१९६७), 'गडकऱ्यांची संसारनाटके' (१९७०), 'प्रदेश साकल्याचा' (१९७९), 'धुके आणि शिल्प' (१९८५), रामदासः प्रतिमा आणि प्रबोध (१९८४), शारदीय चंद्रकळा (१९९२), 'स्फटिक दिवे' (२०००) हे त्यांचे समीक्षाग्रंथ. त्यांचा 'नट, नाटक आणि आपण' हा ग्रंथ जन्मशताब्दी वर्षात प्रकाशित होत आहे, असे कळले.

'अभिरुची'त 'वैशाख' या टोपणनावाने त्यांनी काव्यलेखन केले. १९५५च्या सुमारास लिहिलेली 'उत्तररात्र' ही दीर्घकविता, 'कविता चंद्रकेतूची' या नावाने








अनुक्रमणिका



'युगवाणी'त प्रकाशित झाली आणि २०००मध्ये पुस्तक रूपाने आली. 'तुरे चंद्रफुलांचे' या नावाने या कवितांचा रंगमंचीय आविष्कारसुद्धा झाला होता. पुढे काव्यलेखन बाजूला पडले तरी त्यांची मूळ प्रकृती कवीचीच आहे हे त्यांच्या कादंबरी आणि समीक्षालेखनातही स्पष्ट दिसते. त्यांच्या समीक्षाग्रंथांची आणि त्यातील प्रकरणांची शीर्षके आणि त्यांची शैली याची साक्ष देतात.

सरदेशमुखांनी 'बखर'चे 'टाहो' (१९८२) हे नाट्यरूपांतर केले, 'व्हिक्टर ह्यूगो'च्या 'द लाफिंग मॅन'वर आधारित 'थैमान'(१९८६) हे नाटक लिहिले. ही दोन्ही नाटके प्रयोगरूपाने यशस्वी झाली नाहीत.

अनुवादक म्हणून त्यांनी केलेली कामगिरी महत्त्वाची आहे. खलिल जिब्रानच्या 'गार्डन ऑफ प्रॉफेट'चा 'देवदूताचे विहारवन' आणि 'फोर रनर'चा 'अग्रदूत' हा अनुवाद केला. 'नरेश माधुरी' या टोपणनावाने आयनेस्कोच्या 'हार्ड टु गेट रीड ऑफ इट'चा 'एकच घडकी' हा अनुवाद केला. मोपाँसाच्या कथांचेही अनुवाद केले. 'सिद्धार्थ, पूर्वेची यात्रा (२००३) हा हरमान हेसेच्या कादंबरीचा आणि आत्मनिवेदनाचा अनुवाद अतिशय मौलिक आहे. याच ग्रंथात हेसेवरील परिचय लेख आणि त्याचे नोबेल पुरस्कार स्वीकारतानाचे छोटेसे भाषणही आहे. गुस्ताव द्याबुश याच्या 'काफ्काशी संवाद'चा त्यांचा अनुवाद २००४मध्ये दै. सकाळ, सोलापूरमध्ये लेखनरूपाने आणि २००६मध्ये म्हणजे त्यांच्या निधनानंतर पुस्तकरूपाने प्रकाशित झाला. आणखी एक नुकतीच घडलेली महत्त्वाची घटना येथे नमूद करणे मला अगत्याचे वाटते. ती म्हणजे 'आशय'ने सरदेशमुख सरांच्या टीपा आणि टाचणे यांचा ५६ पृष्ठांचा उत्कृष्ट अंक काढला आहे. (एप्रिल २०१९) एखाद्या व्यासंगी व्यक्तीच्या व्यक्तिगत टिपणांवर संपूर्ण अंक यापूर्वी काढल्याचे मला तरी माहीत नाही, कोणी काढला असेलही; पण नितीन वैद्य आणि त्यांचे सहकारी पुरुषोत्तम नगरकर, जयंत राळेरासकर यांना धन्यवाद द्यायलाच हवेत. त्यांनी अतोनात परिश्रम करून साठ वर्षांतील हे वैचारिक धन मिळवून अभ्यासकांपुढे ठेवले आहे. सरदेशमुखांच्या प्रज्ञेचा विहार किती व्यापक, चिंतनगर्भ होता हे या टिपणांवरून आणखी कळते. प्रतिकूल मानसिक, शारीरिक अवस्थेत त्यांनी विद्याव्यासंग केला, आणि ज्ञानाला निर्मितीत परिवर्तित केले.

सरदेशमुखांचे घराणे मूळचे अक्कलकोट संस्थानचे. घराण्यात सरदेशमुखी वतन होते. वडील विनायक मल्हार संस्थानात अधिकारपदावर; बुद्धिमान; चौफेर वाचन असलेले; राजाच्या जवळच्या माणसांपैकी. सात्त्विक, प्रामाणिक वृत्तीमुळे त्यांना शत्रूही निर्माण झालेले होते. संस्थानचा राजाही वाचनप्रेमी; कलाप्रेमी; प्रजेविषयी कळवळा असलेला. त्याच्या मृत्यूनंतर संस्थानात अराजक माजले. राजाच्या जवळच्या निष्कलंक माणसांना लक्ष्य केले गेले आणि सरदेशमुख कुटुंब १९३१मध्ये नेसत्या वस्त्रानिशी अपमानित अवस्थेत सोलापूरला आले. पिता-पुत्राच्या मनावर बसलेला घाव त्यांची जन्मभराची जखम ठरली. त्र्यं. वि.चे अक्कलकोटमधील बालपण सुखात, समृद्ध संस्कारांत गेले; पण नंतर मात्र आर्थिक विवंचना, विमनस्कता सर्वच कुटुंबीयांच्या वाट्याला आली. त्र्यं. वि.चे संवेदनशील कविमन होरपळून निघाले. हरिभाई देवकरण प्रशालेत असताना हळूहळू लेखन सुरू झाले. पुढे स. प. महाविद्यालयात नामवंत प्राध्यापकांचा लाभ झाला. भरपूर ग्रंथवाचन, हॉलिवूडचे उत्तमोत्तम चित्रपट पाहणे, अभिजात शास्त्रीय संगीत ऐकणे या बळावर ते थोडे सावरत गेले; पण एकामागोमाग एक जिवलगांचे मृत्यू पाहावे लागले आणि मनाच्या तळाशी दुःखाची, मृत्यूच्या दाहकतेची छाया कायमची वसतीला आली. ते एकाकी, उदास, साहित्य वर्तुळापासून अलिप्त राहिले. एकांतप्रिय झाले.

या परिस्थितीत त्यांना सोबत मिळाली ती, थोर ग्रंथांची, विचारवंत सत्पुरुषांची, स्नेहशील सुहृदांची. द. रा. बेंद्रे, बाबामहाराज आर्वीकर यांचा मन शांतवणारा सहवास त्यांना लाभला. शिवाय ग्रंथरूपाने जे. कृष्णमूर्ती, गुरुदेव रानडे, आचार्य रजनीश, लो. टिळक, म. गांधी, विनोबा, रवीन्द्रनाथ टागोर, सरोजिनी नायडू हे सारे सोबतीला होतेच. सरदेशमुखांचा जीवनानुभव आणि त्यांच्या चिंतनाचा विषय झालेल्या व्यक्ती आणि वाङ्मय पाहिले की, त्यांच्या साहित्यनिर्मितीचा स्थायिभाव आणि त्यांची जीवनदृष्टी, समीक्षादृष्टी यांचे आकलन होते. अध्यात्मविचार, अज्ञेयाचे, गूढतेचे आकर्षण, सत्याची, आत्मानुभूतीची, शिव-मंगलाची आस हा त्यांचा जीवनधर्म, साहित्यधर्म का आणि कसा ठरला ते कळू शकते.

तेराव्या शतकाच्या आणि त्यापूर्वीच्याही साहित्यापासून ते विसाव्या शतकाच्या अखेरपर्यंतचे महत्त्वाचे सर्व मराठी साहित्य त्यांनी मनःपूर्वक अभ्यासले होतेच, शिवाय देशोदेशीचे पाश्चात्त्य लेखक, कवी, तत्त्वचिंतक ग्रंथरूपाने त्यांच्या चिंतन-मननात होते. सी. जी. युंग, निकोलाय बर्दिएव्ह, इमर्सन, युनामुनो, खलिल जिब्रान, काफ्का, कामू, किंकेगार्ड, जॉर्ज सान्तायाना, नॉथ्रॉप फ्राय, हरमान हेसे, हेगेल, स्पिनोझा, व्हिक्टर ह्यूगो, शेक्सपिअर, युजीन

ओनील, आयनेस्को इ. इ. ही यादी आणखीही मोठी होईल. मराठी, संस्कृत, इंग्रजी या भाषांवर प्रभुत्व असलेल्या सरदेशमुखांनी आपल्या लेखनात या तीनही भाषांतील लेखकांचे दिलेले अचूक संदर्भ पाहिले, की मन थक्क होते. विचारातील समानसूत्रे ते सहजतेने उलगडत जातात. दोन भिन्न देशातील, भिन्न कालखंडातील साहित्यिक; पण त्यांच्यात विचारांचा, चिंतनाचा समान धागा असतो, त्यासह केलेल्या विवेचनामुळे सरदेशमुखांची समीक्षा संपन्न ठरते. जे. कृष्णमूर्तीचा आध्यात्मिक अनुभव म्हणजे ज्ञानदेवांचा 'स्वसंवेद्य आत्मरूपाचा' प्रत्यय होता अशी तुलना ते करतात. रामदासांनी ही 'साकडी तोडिली माझी। राहावें करुणालयें।' यात आपला आत्मानंद व्यक्त केल्याचे दाखवून देतात. खलिल जिब्रानवर लिहिताना त्यांना नारदभक्ति सूत्र आठवते. -

*यज्ज्ञात्वा मत्तः भवति। स्तब्धः भवति।*

*आत्मारामः भवति।*

ईश्वराचे प्रेम लाभले की, माणूस तृप्त होतो, त्याला अमृतानुभव मिळतो. शोकभाव नष्ट होतो. खलिल जिब्रानची अशीच श्रद्धा होती. जिब्रानची सखी बार्बरा हिने त्याच्याविषयी लिहिलेले, 'ही वॉज अनप्रेडिक्टेबल अँड डिफिकल्ट' हे वाचल्यावर त्यांना राम गणेशांचे स्मरण होते. ते लिहितात, 'अशी दार्शनिक कलात्म प्रज्ञा कोठल्याही समाजात वारंवार निपजते, असे नाही. तिचे संस्मरण हा त्या त्या समाजसमूहाचा आंतरिक ऊर्जापुंज होऊन राहातो.' ('सखा-सांगाती खलिल जिब्रान पृ. ११४ 'स्फटिकदिवे') गडकऱ्यांचा हा ऊर्जापुंजच त्यांना 'युगान्तक' वाटतो. ('युगान्तक गडकरी' हा लेख - 'धुके आणि शिल्प')

'श्रीगुरुदेवांची महात्मता' हा प्रा. रा. द. रानडे यांच्यावरचा सरदेशमुखांचा लेख 'संतकृपा' जून २००२मध्ये प्रसिद्ध झाला आहे. त्यात गुरुदेवांचा मिस्टिसिझम, ज्ञानदेवांचा मिस्टिसिझम यांची चर्चा आहे. काण्टच्या तत्त्वविवेचनात प्रा. रानडे यांना अंतःप्रेरणेचा अभाव आढळतो त्यावरचे विवेचन आहे. सरदेशमुख हे अंतःप्रेरणेला, आत्मप्रत्ययाला, 'मी'कडून विश्वात्मकतेकडे जाण्याच्या प्रवासाला मानतात; पण या वाटेवरचा प्रवास अंतःकरणाला दमविणारा असतो, त्या अटळ वास्तवातील स्वार्थ, सत्तालोलुपता, हिंसा, कारस्थाने, द्वेष, मत्सर, वासना यांचे तांडव कलाकृतीतून दृश्यमान करणे अपरिहार्य ठरते. 'बखर', डांगोरा' सत्-असत्, सन्मार्गी-उन्मार्गी, प्रेमळ-दुष्ट अशा परस्परविरोधी स्वभाव, प्रवृत्ती असलेल्या व्यक्तींच्या उक्ती-कृतींच्या सौंदर्यपूर्ण, कलात्मक विणकामाने नटलेल्या आहेत. दोन्ही कादंबऱ्यांमध्ये अक्कलकोट संस्थानातील घटनांचे, व्यक्तींचे, काही बदल करून केलेले चित्रण आहे.

'बखर' राजा रघुवीरसिंहाच्या रोजनिशीच्या स्वरूपात अवतरते. साईखेड संस्थानचा हा राजा. साईखेड म्हणजे कळसूत्री बाहुली. राजा आणि इतर पात्रेही कळसूत्री बाहुल्यांसारखीच जगत आहेत. हा राजा कविप्रकृतीचा; कलाप्रेमी; सुसंस्कृत; अनेक गुण अंगी आहेत; पण सर्वच नातेसंबंधात निष्प्रेम जीवन वाट्याला आलेला; एकाकी; उदास, तो आपल्या अस्तित्वाचा अर्थ शोधतो आहे. संस्थानातील कुटिल कारस्थानांना तो आळा घालू शकत नाही. ज्या राजस नावाच्या स्त्रीवर मनोमन प्रेम जडते तिच्याशी विवाह करू शकत नाही. ''मी कशाचा तरी गुलाम आहे... कसल्यातरी साखळदंडांनी आवळलेला'' (बखर, पृ.६४) या तीव्र जाणिवेने हताश झालेला राजा, आत्मशोध घेता घेता थकून आपल्या जीविताचा अंत करून घेतो, ती तारीख मे १९२२. स्वातंत्र्यपूर्व काळ. स्वातंत्र्यप्राप्तीसाठी बाहेरच्या जगात चाललेल्या चळवळी, संस्थानांवर ब्रिटिशांची नजर हे संदर्भ येतात. या कादंबरीची काव्यमय शैली, व्यक्तिचित्रण, प्रतीके, स्वप्नदृश्यातील सेक्सचे विलक्षण धीट चित्रण, साईखेड संस्थानचे चित्रदर्शी वर्णन हो वैशिष्ट्ये वाचकाचे मन आकर्षून घेणारी आहेत. मानवी अस्तित्वाचा शोध घेण्याची, जीवन-मृत्यूचा अर्थ लावण्याची धडपड संवेदनशील मनच करते. सरदेशमुखांमधील कलावंत आणि समीक्षकहो तेच करीत

**“ 'श्रीगुरुदेवांची महात्मता' हा प्रा. रा. द. रानडे यांच्यावरचा सरदेशमुखांचा लेख 'संतकृपा' जून २००२मध्ये प्रसिद्ध झाला आहे. त्यात गुरुदेवांचा मिस्टिसिझम, ज्ञानदेवांचा मिस्टिसिझम यांची चर्चा आहे. काण्टच्या तत्त्वविवेचनात प्रा. रानडे यांना अंतःप्रेरणेचा अभाव आढळतो त्यावरचे विवेचन आहे. सरदेशमुख हे अंतःप्रेरणेला, आत्मप्रत्ययाला, 'मी'कडून विश्वात्मकतेकडे जाण्याच्या प्रवासाला मानतात; पण या वाटेवरचा प्रवास अंतःकरणाला दमविणारा असतो, त्या अटळ वास्तवातील स्वार्थ, सत्तालोलुपता, हिंसा, कारस्थाने, द्वेष, मत्सर, वासना यांचे तांडव कलाकृतीतून दृश्यमान करणे अपरिहार्य ठरते. 'बखर', डांगोरा' सत्-असत्, सन्मार्गी-उन्मार्गी, प्रेमळ-दुष्ट अशा परस्परविरोधी स्वभाव, प्रवृत्ती असलेल्या व्यक्तींच्या उक्ती-कृतींच्या सौंदर्यपूर्ण, कलात्मक विणकामाने नटलेल्या आहेत. दोन्ही कादंबऱ्यांमध्ये अक्कलकोट संस्थानातील घटनांचे, व्यक्तींचे, काही बदल करून केलेले चित्रण आहे. ”**

आलेला दिसतो.

'डांगोरा'चा प्रारंभ जुलै १९२९मधील एका घटनेने होतो. 'बख'मधील सूत्र पुढे चालू राहते. १३६ पात्रसंख्या, मन विदीर्ण करणाऱ्या भयकारी घटना, आणि सात्त्विकतेचा तत्त्वनिष्ठेचा पराभव! पाच-सात हजार लोकवस्तीच्या या चिमुकल्या संस्थानातला सैतानी कल्लोळ, सज्जनांची दुर्दशा यांतून विसाव्या शतकातील भयाण वास्तव सरदेशमुखांनी विलक्षण ताकदीने मांडले आहे. हे मांडत असताना त्यांना अभिप्रेत असलेला आशय अनेक अर्थसंपृक्त वाक्यांतून, उत्कृष्ट शैलीत जागोजागी व्यक्त झालेला दिसतो, तसाच तो त्यांच्या मनोगतातही दिसतो. 'अविद्या आणि अधर्म यांचा पाडाव करणाऱ्या शक्ती प्रत्येकाने जाणीवपूर्वक जोपासाव्या लागतात. संतसत्पुरुषांच्या उपासना त्यासाठीच अहोरात्र चालू असतात. व्यक्तिगत जीवनाला मुक्तिविश्रांती मिळते ती सुजनता आणि परस्पर मैत्री यातूनच.' सरदेशमुखांनी म्हटले आहे, 'कलात्मक साहित्य एका सूक्ष्म अर्थाने भयावह विश्वरूपाचे अणुचित्र असते असे म्हणावेसे वाटते.' ('उद्ध्वस्तपणाचे धुमारे' पृ.३७ 'प्रदेश साकल्याचा') मग या भयावह विश्वरूपात कलावंताचे कार्य काय इकडेही त्यांनी लक्ष वेधले आहे. ते म्हणतात - 'साहित्य, संगीत, चित्र-नाटक इ. कलामाध्यमांतून आविष्कार करणाऱ्या प्रतिभावंतांनी अशा काळोख्या रात्री विशेष जागे आणि सावध राहावे लागते. समाजाचे चित्ताकाश निर्मळ उल्हासाचे कसे होईल यासाठी निकराने कटिबद्ध होणे जरूर असते.' (साहित्याचे प्राणपंख : आस्था आणि सद्भाव- पृ.१३ 'स्फटिकदिवे')

सरदेशमुखांच्या कादंबऱ्यांमधला गर्भित आशय आणि त्यांच्या समीक्षेचा रोख हातात हात घालून चालताना दिसतात. त्यात एक विलक्षण सुसंगती आहे. याचे कारण सर्व लेखनाच्या मुळाशी आत्मप्रत्यय आणि भद्राकांक्षा आहे. 'मानव तितुका एकचि आहे, आणि प्रेम, सौदर्य, सुजनत्व हा मानवी जीवनाचा स्थायिभाव आहे. याला ढळ पोहोचविणाऱ्या व्यक्तींची जबाबदारी समाजातील प्रत्येकावर आहे, असे त्यांनाही वाटते, म्हणून ते म. गांधींचे वाक्य उद्धृत करतात - 'आय कॅनॉट हेट हिटलर. आय हेट हिज ॲक्ट्स्' ('साहित्याचे प्राणपंखः आस्था आणि सद्भाव पृ.१३ 'स्फटिकदिवे') प्रश्न असा आहे, की इतकी महाउदारता, विश्वव्यापकता व्यावहारिक पातळीवरून पेलणे शक्य आहे का? सरदेशमुखांची समीक्षा, असे काही पेच वाचकांपुढे ठेवते. दैनंदिन जीवन जगत असताना विशाल, विस्तीर्ण आकाशाचे भान असले तरी लक्ष असते आपल्या घराच्या खिडकीतून दिसणाऱ्या आकाशाकडे! कारण आपल्या सुख-दुःखांची, समस्यांची चित्रे वेगवेगळ्या आकारात तिथेच उमटत असतात. सरदेशमुखांच्या आध्यात्मिक समीक्षेने मराठी साहित्यसमीक्षेत मूळ धरले नाही; पण तिचे महत्त्व आणि जातिवंत प्रामाणिक आत्मप्रत्यय नाकारता येणार नाही. समीक्षेची वेगळी वाट प्रचंड आत्मविश्वासाने त्यांनी धरली आहे आणि पेललीही आहे.

अध्यात्माची ओढ असलेले, किंबहुना अशी ओढ असल्यानेच सरदेशमुख 'उच्छाद'मधील श्रीधरची ईश्वराला कसाई मानण्याची भावना चित्रित करतात. श्रीधर हा 'बखर' आणि 'डांगोरा'मधील अत्यंत सज्जन, सत्प्रवृत्त देसायांचा मुलगा. त्यांच्या आयुष्याची वाताहत त्याने बालवयापासून पाहिलेली. मनोरुग्ण झालेल्या या मुलाची कहाणी लिहितानाचे मनोविश्लेषण, अटळ नियती, एकाकी उद्ध्वस्तपणा या सगळ्यांचे चित्रण वाचकाला अस्वस्थ करणारे आहे.

सरदेशमुखांच्या कादंबऱ्यांमध्ये शोकसंवेदन, उदासीनता, निराशा, मृत्यू, नियती हे घटक दिसतात; पण समीक्षेत मानवी जीवनातले दुःखभोग, हृदयांतरीचे आर्त सोसूनही आनंदाची, मांगल्याची, प्रेमभावनेची,

**“ सरदेशमुखांच्या कादंबऱ्यांमधला गर्भित आशय आणि त्यांच्या समीक्षेचा रोख हातात हात घालून चालताना दिसतात. त्यात एक विलक्षण सुसंगती आहे. याचे कारण सर्व लेखनाच्या मुळाशी आत्मप्रत्यय आणि भद्राकांक्षा आहे. 'मानव तितुका एकचि आहे, आणि प्रेम, सौदर्य, सुजनत्व हा मानवी जीवनाचा स्थायिभाव आहे. याला ढळ पोहोचविणाऱ्या व्यक्तींची जबाबदारी समाजातील प्रत्येकावर आहे, असे त्यांनाही वाटते... प्रश्न असा आहे, की इतकी महाउदारता, विश्वव्यापकता व्यावहारिक पातळीवरून पेलणे शक्य आहे का? सरदेशमुखांची समीक्षा, असे काही पेच वाचकांपुढे ठेवते. दैनंदिन जीवन जगत असताना विशाल, विस्तीर्ण आकाशाचे भान असले तरी लक्ष असते आपल्या घराच्या खिडकीतून दिसणाऱ्या आकाशाकडे! कारण आपल्या सुख-दुःखांची, समस्यांची चित्रे वेगवेगळ्या आकारात तिथेच उमटत असतात. सरदेशमुखांच्या आध्यात्मिक समीक्षेने मराठी साहित्यसमीक्षेत मूळ धरले नाही; पण तिचे महत्त्व आणि जातिवंत प्रामाणिक आत्मप्रत्यय नाकारता येणार नाही. समीक्षेची वेगळी वाट प्रचंड आत्मविश्वासाने त्यांनी धरली आहे आणि पेललीही आहे. ”**



अनुक्रमणिका

सौंदर्यपूर्णतेची कांक्षा वाळगणारे कलावंत, तत्त्वज्ञ महामानव भेटतात. 'अंधारयात्रा'मध्ये केशवसुत, बालकवी, गोविंदाग्रज, मर्ढेकर यांच्या कवितेच्या मुळाशी त्यांचा दुःखानुभव कसा आहे हे सांगून हे कवी आनंदाची, सौंदर्याची, प्रेमगाणी कशी गातात, त्यातला अनुबंध उलगडून दाखवतात. 'कवी स्फुंदत असतो त्या वेळी त्याची कविता गात असते.' (नवा आकांत बा. सी. मर्ढेकर १९०९-१९५६ पृ.८५ 'अंधार यात्रा') या एकाच वाक्यात फार मोठा आशय सामावलेला आहे. याच ग्रंथात काव्यविषयक तात्त्विक चर्चाही आहे. 'गडकऱ्यांची संसार नाटके' या ग्रंथात त्यांच्या नाटकातील घटना, प्रसंग, व्यक्तिरेखा यांची स्वतंत्र समीक्षा करून, ही नाटके व्यक्तींच्या संसारांची रूपे कशी ठरतात ते दाखवतात. त्यांच्या वैयक्तिक जीवनातील अनुभवांमुळेच ती नाटके लिरिकल आहेत असे मत ते मांडतात. कलेत अलिप्तता असावी, कलावंताने व्यक्तिगत भावबंधनातून मुक्त होऊन कलानिर्मिती करावी, तसे झाले नाही, तर तिला श्रेष्ठतेची, सर्वात्मकतेची मुद्रा लाभत नाही. या विचाराशी सरदेशमुख सहमत नाहीत. 'धुके आणि शिल्प'मध्ये गडकरी, नारायण सुर्वे, दलित काव्य, विद्याधर वैद्य आणि ग्रेस यांच्याविषयीचे लेख आहेत. या ग्रंथाला प्रा. म. द. हातकणंगलेकर यांची प्रस्तावना आहे. सरदेशमुखांच्या समीक्षेविषयी ते म्हणतात - 'सदासर्वकाळ सर्व माणसे, कवीसुद्धा साकल्याच्या प्रदेशास वास करीत नसतात. हे या समीक्षादृष्टीला स्वीकारता येत नाही. यामुळे या दृष्टीला लौकिक जीवनासंबंधीचे उपेक्षायुक्त एकारलेपण प्राप्त होते. ते कदाचित अटळ असते.' प्रचंड व्यासंग आणि निर्मितीक्षमता असूनही सरदेशमुख मराठी साहित्यविश्वात लेखक, कलावंत म्हणून तसे बाजूला का पडले याचे अचूक निदान या प्रस्तावनेत केले गेले आहे. 'रामदासः प्रतिभा आणि प्रवोध'मध्ये रामदास हे निवृत्तिमार्गीच संतकवी आहेत असा प्रत्यय व्यक्त केला आहे. प्रा. न. र. फाटक, प्रा. माटे, राजवाडे यांच्याशी असलेले मतभेद स्पष्टपणे मांडले आहेत. 'शारदीय चंद्रकळा'मध्ये शरश्चंद्र मुक्तिवोध, कुसुमाग्रज, द. रा. बेंद्रे, हरमान हेसे, ब्रेख्त, व्हिक्टर ह्यूगो, युजीन, आयनेस्को यांच्यावरील लेख आहेत. लेखांसाठी त्यांनी निवडलेल्या व्यक्ती पाहिल्या, त्या अनुषंगाने येणारे संदर्भ पाहिले की, त्यांच्या मनाची ओढ, चिंतनाचा अवकाश ध्यानी येतो. त्यांना समीक्षा हा जीवनाचा सहजधर्म वाटतो.

सरदेशमुखांच्या लेखणीचे सामर्थ्य ज्यांनी ओळखले अशा, श्री. पु. भागवत, द. रा. बेंद्रे, प्रा. निशिकांत ठकार, प्रा. गो. म. कुलकर्णी, गो. रा. कामतकर यांनी त्यांच्यातील निर्मितिक्षमता, कलावंताची स्फुरणे जोपासली. नितीन वैद्य, जयंत राळेरासकर, सुनील साळुंखे, रजनीश जोशी, डॉ. गौरीशंकर गंगा, दत्ता हलसगीकर, अरुण खोरे, विवेक घळसासी अशा अनेक सुहृदांनी या मनस्वी, संवेदनशील, प्रज्ञावंत, प्रतिभावान कलावंताच्या जीवनात सोनेरी क्षण आणले. त्यांच्या एकांताला धक्का न लावता आवश्यक तेवढा लोकान्त दिला. त्यांना बोलते-लिहिते ठेवले. हेही साहित्यावरचेच ऋण आहे.

त्र्यं. वि. सरदेशमुख हे कविप्रकृतीचे, वृत्तिगांभीर्य जोपासणारे मनस्वी कलावंत. आस्था आणि सद्भाव या साहित्याच्या प्राणपंखांवर मूल्याधिष्ठित, आत्मप्रत्ययी निर्मिती करणारे प्रज्ञावान. प्रतिभावान. अध्यात्म हा त्यांचा ध्रुवतारा. त्या वाटेला शबलित करणारी त्यांची चित्रणे हे मानवाचे अटळ भागधेय. अंधारवाटेकडून प्रकाशवाटेकडे नेऊ पाहणाऱ्या सरदेशमुखांच्या कलाकृती आणि त्यांचे समीक्षाग्रंथ मराठी साहित्यविश्वात आपल्या मुक्त, स्वतंत्र धारणेने अ-पूर्व ठरतात. भद्राकांक्षी, प्रेममय, सौंदर्यमय मानवी अस्तित्वाची स्वप्नरेखा ठळकपणे उमटवू पाहणारे सरदेशमुख भारतीय ऋषींनी आणि ज्ञानदेवादि संतांनी उजागर केलेल्या शाश्वतधर्माचेच संकीर्तन करतात. (मात्र ज्ञानेश्वरी त्यांना कलात्मक साहित्यबंध म्हणून भावत नाही!) (संदर्भ - प्रा. गो. म. कुलकर्णी आणि प्रा. निशिकांत ठकार यांनी घेतलेली मुलाखत -पृ. १८७ 'धुके आणि शिल्प')

भारतीय संत परंपरा आणि पाश्चात्त्य विचारवंतांचे जीवन चिंतन यांच्या सम्यक् परिशीलनातून, अस्तित्वाचे स्वरूप आकळणे आणि अस्तित्वाला अर्थ देणे यातील ध्रुवमध्य सरदेशमुखांच्या प्रतिभेने मुखरित केला.

'ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञत्वा मोक्ष्सेऽ शुभ्यात्' हे भ. गीतेत सांगितलेली अशुभापासूनची सोडवणूक त्यांच्या विचारविश्वाच्या तळाशी होती. दैवी जाणिवेतून (डिव्हाइन सेल्फकॉन्शसनेस) अक्षरांचा श्रम करणारे त्र्यं. वि. सरदेशमुख, एकांडे शिलेदार का असेनात; पण ते होते, आणि साहित्यरूपाने आहेत हे मराठी मायबोलीचे भाग्यच आहे!

**(टीप - या लेखासाठी श्री. नितीन वैद्य यांचे मौलिक साहाय्य झाले. ऋणी आहे.)**

●













पुस्तक परीक्षण

# अनुराधा पाटील : ‘कदाचित अजूनही’

डॉ. विलास पाटील

कवयित्री अनुराधा पाटील यांच्या कविता १९७२ पासून प्रकाशित होत आहेत, आणि ‘कदाचित अजूनही’ (२०१७) हा त्यांचा पाचवा कवितासंग्रह. या अगोदर ‘दिगंत’ (१९८१), ‘...तरीही’ (१९८५), ‘दिवसेंदिवस’ (१९९२) आणि ‘वाळूच्या पात्रात मांडलेला खेळ’ (२००५) हे चार कवितासंग्रह प्रकाशित झाले आहेत. सौंदर्य, भाव, ग्रामीण, स्त्रीसत्त्व आणि महानगरी; या आशयसूत्रांना अभिव्यक्त करणारी अनुराधा पाटील यांची कविता आज एका नवीन टप्प्यावर उभी आहे. तो नवीन टप्पा किंवा वळण म्हणजे; वरील आशयांची वर्तुळे भेदणारा असून, या संग्रहातील कविता अवैदिक देशीयतेच्या मुख्य आणि व्यापक प्रवाहात सामील होणाऱ्या कविता आहेत. ‘कदाचित अजूनही’ हे नाव, प्रारंभ काव्य ओळी, आशयघन चित्र आणि मलपृष्ठावरील काव्य यामुळे हा संग्रह अंतर्बाह्य काव्यात्म आणि काव्यमय झाला आहे. यात एकूण ५१ कविता आहेत.

बालपण, ग्रामीण परिसर आणि कविता लेखन याबद्दल अनुराधा पाटील म्हणतात, ‘माझ्या वयाची सगळी संवेदनशील वर्षं खेड्यात गेल्याने माझ्यावर तिथलेच संस्कार आहेत. माझ्या आसपास आणि घरात रूढार्थाने कोणतेही वाङ्मयीन वातावरण नव्हते. खेड्यापाड्यात जशी मुले वाढतात तशीच मी वाढले. मुलगी म्हणून अधिकच बंदिस्त वातावरणात मलाही वाढवलं गेलं. फक्त इतरांपेक्षा अधिक असा शब्दांचा नाद मला लहानपणापासून होता. गाण्यांमधून, गोष्टींमधून माझ्यापर्यंत पोचणारं भोवतीचं जग मी संवेदनशीलतेनं बघत होते. कदाचित यातूनच पुढे मी कवितेकडे वळले असेन, असं मला वाटतं.’ (पंचधारा, ऑक्टो-डिसेंबर २०१८ पृ. ४७-४८)

अवैदिक देशीयता सिंधू संस्कृतीच्या अगोदरपासून अस्तित्वात आहे. मूळ सांख्य, लोकायत, मूळ योग, तंत्र, जैन, बौद्ध (शून्यवाद-विज्ञानवाद-वैभाषिक-सौत्रांतिक), मूळ न्याय, मूळ वैशेषिक, भक्ती, नाथ, सिद्ध, लिंगायत, महानुभाव, सूफी, वारकरी, महात्मा फुले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे विचार- साहित्य अवैदिक देशीयता अधोरेखित करणारे आहे. वैदिक संस्कृतीने शूद्र, अतिशूद्र आणि स्त्रियांवर बंधने लादली. वर्णव्यवस्था-जातीव्यवस्था-धर्म आणि लिंगभेदाविरुद्ध सशक्त असा आवाज अवैदिक विचारधारेने उचलून धरला.

अवैदिक देशीयतेत मातृसत्ता, नैतिकता आणि संस्कृतीचा आदर व बोलीभाषेचा सन्मान केला जातो. अवैदिक देशीयता मुळात सहिष्णू आणि अहिंसावादी आहे. सिंधू संस्कृतीत शिव अर्थात ‘महादेवाबद्दल’ श्रद्धा होती आणि तो पानाफुलांत आनंदी होता.

*वेळात वेळ काढून बनवला*
*घरातल्या घरात*
*वाळूचा महादेव*
*मग पानं फुलं पूजापत्री*
*करता करता केला उद्याच्या*
*सगळ्या कामांचा विचार*

स्त्री मुळातच सोशिक आणि उदार अंतःकरणाची आहे. संस्कृती आणि काळाच्या पडद्याआड सतत हिंसाविरोधी भूमिका घेते, म्हणून ती सहिष्णू आहे.

*कदाचित उसळत होतं*
*रक्त कुणाकुणाचं*
*कोण्या एके काळी*
*हातातल्या शस्त्राची धार*
*अजमावण्यासाठी*
*पण पात्याच्या धारेवर*
*सर्रकन बोट फिरवणं*
*आपलं किंवा दुसऱ्याचं*
*जमलं नाही कधीच*
*प्रयत्न करूनही*



अनुक्रमणिका








**“ मराठी संतांनी आपलं मनोगत व्यक्त करण्यासाठी विठ्ठलाचा आधार घेतला, तसं अनुराधा पाटील आपल्या जीवनाचा आणि जगण्याचा आधार म्हणून कवितेकडं पाहतात. शरीरात रक्त त्याप्रमाणे आपला श्वास, आपलं जगणं कवितामय झालं आहे. हे सांगताना त्या म्हणतात, १) मी कविता लिहिते/ तेव्हा कृतीच करत असते, २) मला नुसतं / कवितेत तरी राहू दे, ३) भाकरी भाजत कविता वाचाव्यात / तर कविता करपल्याचा वास/ पसरतो सर्वत्र, ४) भटकू दे रानोमाळ/ माझ्या कवितेला भणंग 'अनवाणी', ५) आणि दूरवर फरफटत गेलेली/ तुटकी चप्पल / शिस्तच नाही कवितेच्या/ पोळलेल्या पायात, ६) कविता एवढी एकच गोष्ट/ जवळ असली तरी, ७) कवितेशी काही देणं ना घेणं / असा हा भोवताल, ८) वायांएवढीच / जुनी आहे कविता - या आणि अशा अनेक ओळी अनुराधा पाटील आणि कविता यांच्या अंतस्थ नात्यावर प्रकाश टाकतात. अर्थात कविता ही त्यांच्या जीवनात सुखदु:खाची वाहक आहे. संवाद आणि विरेचनाचं ठिकाण आहे. ”**

अनुराधा पाटील यांची कविता स्त्रीवादी नाही, तर समग्र स्त्रियांच्या दु:खाला वाट करून देणारी मातृसत्ताक अर्थात मातृप्रधान; लिंगभेदाच्याही पलीकडे जाऊन माणूसपणाचा पुरस्कार करणारी कविता आहे.

*दरम्यान ओसरीच्या*
*गंजलेल्या खिळ्याला*
*अडकून*
*फाटत राहतं वारंवार*
*ऐन जगण्यासारखं*
*माणूसपणाचं*
*विरलेलं अस्तर*
*या आयत्या युगात*

येथे 'गंजलेला खिळा' हा भूतकाळासाठी तर 'आयत्या युगात' ही प्रतिमा वर्तमानकाळाचा निर्देश करणारी आहे. माहेरातील एक वृद्ध स्त्री; आपल्या बालमनावर पहिल्यांदा तिच्याकडून कवितेचे संस्कार झाले, हे सांगताना अनुराधा पाटील म्हणतात-

*ती उलटायची कुतूहलाने*
*माझ्या फाटक्या*
*पुस्तकाची पानं*
*आणि गुणगुणायची*
*अधून मधून*
*काळजात कुसळं भरणाऱ्या*
*ओव्या*
*ओठातल्या ओठात*

समग्र स्त्रियांचं प्रातिनिधिक दु:ख कवितेच्या रूपात ती सोडून गेली. कवयित्री म्हणते-

*वाऱ्यावर उडून जाणाऱ्या*
*पिवळ्या पानासारखी*
*ती उडून गेली*
*माझ्या आयुष्यातून*
*कवितेचा विषारी साप*
*तेवढा*
*माझ्या अंगणात सोडून*

वर्तमान भारतीय स्त्रियांच्या जीवनात सर्व बाजूने सुख आणि आनंदाचा अभाव आहे. वानवा आहे, अनुराधा पाटील यांची कविता स्त्रियांच्या आदिम दु:खाला अभिव्यक्त करत; सर्व बाजूने हरल्यानंतर कवितेत आपल्या जीवनाचे सार आणि आधार शोधते. त्यांची कविता क्वचित प्रसंगी स्त्रीवादाचा उद्गार बनते.

*१) भुकेला लाज नसते*
*अन् बाईच्या चामड्याला*
*जात म्हणत*
*तू वावरलीस मुकाट*
*गायीच्या करुण डोळ्यांनी*
*हयातभर*

*२) रात्र चालते मग*
*आपल्या काळ्या पंज्यात*
*अवघा अवकाश कवळून*
*थरथरते थोडी आतली तार*
*मौनाच्या सुरांवरच लावलेली*
*आणि पडत्या पडत्या*
*ऐकू येत राहतो*
*सुप्त कोलाहलाचा स्फोट*
*होत्याचं नव्हतं करणारा*

येथे करुणा आणि सोशिकपणा-बरोबरच विद्रोहही आहे. स्त्रियांच्याच जीवनात उपेक्षित आभाळ का? स्त्रीच्या पोटी जन्म घेणारे पुरुष शेवटी स्त्रीविरोधी भूमिका का घेतात? असे प्रश्न कवयित्रीला पडतात. वर्तमान मुलींच्या



- कदाचित अजूनही
- अनुराधा पाटील
- शब्द पब्लिकेशन,
- पृष्ठे : १२८
- मूल्य : २००/-



अनुक्रमणिका

दुःखाचा शेवट हुंड्याअभावी आत्महत्येत होतो. हे सांगताना अनुराधा पाटील लिहितात-

*चूल बोळक्यांशी खेळत / मोठ्या होणाऱ्या पोरी / बाशिंगबळच कमी म्हणत / मुकाट विसावतात / विहिरीच्या तळाशी*

स्थावर मालमत्ता, बळ आणि अहंकार यांच्या जोरावर पुरुषी मानसिकता स्त्रीला गुलाम बनवू पाहते आणि मानसिक स्तरावर वस्तूवत समजते.

*पुरुषाच्या कल्पनेत असते / नेहमीच एक काल्पनिक बाई / जी असते आपल्यापेक्षा / संपूर्ण वेगळी / नवे नवे देह असणारी / तो पुरुषप्रधान संस्कृतीचा गढ शाबूत ठेवू पाहतो. / निदान तुला माहीत हवं / आपले तर दिवस / उगवतात मावळतात नेहमी / तिसऱ्या डोळ्याच्या / अदृश्य धाकाखाली*

येथे 'तिसरा डोळा' हा पितृसत्ताक कुटुंबपद्धतीचा वारसा चालवताना दिसून येतो. स्त्रियांचं एकूण जगणंच कवयित्रीला; पुरुषप्रधान संस्कृतीच्या धाकाखाली चालू आहे, असं दिसतं. अशा काळात 'कविता' हीच अनुराधा पाटील यांना मानसिक आधार देणारी सखी वाटते.

मराठी संतांनी आपलं मनोगत व्यक्त करण्यासाठी विठ्ठलाचा आधार घेतला, तसं अनुराधा पाटील आपल्या जीवनाचा आणि जगण्याचा आधार म्हणून कवितेकडं पाहतात. शरीरात रक्त त्याप्रमाणे आपला श्वास, आपलं जगणं कवितामय झालं आहे. हे सांगताना त्या म्हणतात, १) मी कविता लिहिते/ तेव्हा कृतीच करत असते, २) मला नुसतं / कवितेत तरी राहू दे, ३) भाकरी भाजत कविता वाचाव्यात / तर कविता करपल्याचा वास/ पसरतो सर्वत्र, ४) भटकू दे रानोमाळ/ माझ्या कवितेला भणंग 'अनवाणी', ५) आणि दूरवर फरफटत गेलेली/ तुटकी चप्पल / शिरतच नाही कवितेच्या/ पोळलेल्या पायात, ६) कविता एवढी एकच गोष्ट/ जवळ असली तरी, ७) कवितेशी काही देणं ना घेणं / असा हा भोवताल, ८) बायांएवढीच / जुनी आहे कविता, ९) वामनाच्या पावलांसारखी / कवितेची महाकाय पावलं, १०) मी पाहते खिन्न होऊन / कवितेचा मोसम परम येईल म्हणून, ११) काळ्याठिक्कर पडलेल्या दिसतात कविता, १२) कवितेत शिरून / परकाया प्रवेश करण्याची / इच्छा निरर्थक ठरतेय, १३) उमलत नाही आता / आतला खोल एकांत / कविता होऊन, १४) जाणवतील अजूनही / कवितेची मंद स्पंदनं, १५) कवितेशिवायच्या भाकड जगात, पाठीवरही / कविता लिहिणंसुद्धा; या आणि अशा अनेक ओळी अनुराधा पाटील आणि कविता यांच्या अंतस्थ नात्यावर प्रकाश टाकतात. अर्थात कविता ही त्यांच्या जीवनात सुखदुःखाची वाहक आहे. संवाद आणि विरेचनाचं ठिकाण आहे.

परिसर, भाषा, प्रयोग आणि विद्रोह या बाबी एखाद्या कवीला समर्थ ठरण्यास कारणीभूत असतात. महानगरी कवितेचं वर्तुळ फोडून अरुण कोलटकर आणि दि. पु. चित्रे यांची कविता मुख्य कवितेचा भाग बनली. दलित कवितेचं वर्तुळ भेदत महानगरी कवितेवर आघात करत नामदेव ढसाळांची कविता सर्वहारा वर्गाचा आवाज बनत मुख्य प्रवाहात आली. नंतर असाच प्रकार भुजंग मेश्राम यांच्याबाबत झाला. मलिका अमरशेख आणि प्रज्ञा दया पवार यांची कविताही आज मुख्य प्रवाहाचा भाग बनलेली आहे. याच रांगेत आज अनुराधा पाटील यांचं नाव ठळकपणे समोर येत आहे. रोमँटिक कविता, प्रेमकविता, स्त्रीसत्त्वाची कविता, भावकविता, ग्रामीण कविता आणि महानगरी कविता या सर्वांची वर्तुळे भेदून पाटील यांची कविता आज लिंगभेदाच्याही पलीकडे जाऊन स्त्रीपुरुष समानतेचा विचार मांडत; माणूसपणाला शिरोधार्य मानत; मूळ भारतीय अवैदिक देशीयतेच्या मुख्य आणि व्यापक प्रवाहाचा भाग बनली आहे, असे आपणास 'कदाचित अजूनही' या संग्रहाद्वारे ठामपणे म्हणता येईल.

उदाहरणार्थ,

कवितेचं वर्तुळ फोडून बाहेर येणाऱ्या ओळी

**भाव :**

*माणूस नावाचा शब्द निषिद्ध ठरवला गेलाच / नव्या शब्दकोशात / आणि निरपेक्ष काही / करण्याची सहज प्रेरणा / मोडीत निघालीच / प्रत्येक गोष्ट / हातातून सुटत जाण्याच्या / कठीण काळात / शक्यतांचे दरवाजे / बंद करून / मी परत आलेय / माघारी / सोडलाच हट्ट / एकेक काजवा गोळा करून / काळोख उजळण्याचा*

**ग्रामीण :**

*डोक्यावर गवताचे / भारे घेऊन चालणाऱ्या / बांधाएवढीच / जुनी आहे कविता / युगे अठ्ठावीस / रक्तात सळसळणारी / जी नष्ट होतेच / नांगराला टेकून बसलेल्या / हताश माणसासारखी / अविरत*

**महानगरी :**

*आपल्या मागे काळोखात / कुणी उभं असतं / निःशब्द समजूतदारपणे / असं मानता मानता / तू काढून घेतलास / माझा सहज साधेपणा*












> समकालीन कवितेत वापरून गुळगुळीत झालेल्या प्रतिमा आणि प्रतिकांना बाजूला सारत अनुराधा पाटील यांची कविता एकाच वेळी ग्रामीण आणि महानगरी कवितेचं वर्तुळ फोडत ग्लोबल अर्थात वैश्विक होताना दिसते. "भुवया कोरलेली एखादी / जनी पोज देईल ग्लोबल व्हिलेजच्या / बहुरंगी प्रदर्शनात / आणि नखशिखांत / सोंग सजलेला विठ्ठल / सेल्फी घेईल / जनाईच्या उघड्या खांद्यावर / सलगीनं हात ठेवून" अनुराधा पाटील यांची कविता सर्वसामान्य, सर्वहारा शेतकरी, मजूर, कामगार आणि सर्वसामान्य स्त्री-पुरुषांचा आवाज बनते. भाषा, शब्द आणि ओळींच्या बाबत त्यांची प्रयोगशीलता लिंगभेदाच्या चौकटी भेदून व्यापक होते.

समकालीन कवितेत वापरून गुळगुळीत झालेल्या प्रतिमा आणि प्रतिकांना बाजूला सारत अनुराधा पाटील यांची कविता एकाच वेळी ग्रामीण आणि महानगरी कवितेचं वर्तुळ फोडत ग्लोबल अर्थात वैश्विक होताना दिसते.

*भुवया कोरलेली एखादी / जनी पोज देईल ग्लोबल व्हिलेजच्या / बहुरंगी प्रदर्शनात / आणि नखशिखांत / सोंग सजलेला विठ्ठल / सेल्फी घेईल / जनाईच्या उघड्या खांद्यावर / सलगीनं हात ठेवून*

अनुराधा पाटील यांची कविता सर्वसामान्य, सर्वहारा शेतकरी, मजूर, कामगार आणि सर्वसामान्य स्त्री-पुरुषांचा आवाज बनते. भाषा, शब्द आणि ओळींच्या बाबत त्यांची प्रयोगशीलता लिंगभेदाच्या चौकटी भेदून व्यापक होते.

*१) माझ्यासारखा एखादा / फाटका कवी मात्र / वाट पाहील / उनसावलीचे फसवे / कवडसे / तळहातावर झेलत / की जुळवता येईल / अजूनही त्यांच्याशी / तुटलेली नाळ*

*२) कधी काळी आपल्यालाही / पंख फुटतील / अशी आस घेऊन / चालत राहिली आपली वाट / काट्याकुट्यातून / पण पोट आहे म्हणून / भूकही आहे / एवढी साधी गोष्ट / विसरली गेली / आणि भुकेला भूकच म्हणालो / हाही गुन्हाच ठरला / अक्षम्य*

अर्थात, अनुराधा पाटील यांची कविता स्त्री-पुरुष लिंगभेदापलीकडे जाऊन 'माणूस' या संकल्पनेचा सतत विचार आणि चिंतन करणारी, निव्वळ माणूसपणाकडे झुकणारी शांत आणि सहिष्णू आहे.

भूमी, नदी आणि स्त्री यांच्यात एक अंतर्गत नाते आहे. संस्कृतीचा उगम नदी आणि स्त्रियांमुळे झाला आणि शेतीचा शोधही स्त्रियांनीच लावला. जगण्यातून आलेला समंजसपणा, करुणा आणि सुरुवातीच्या एकूण चार कवितासंग्रहानंतर प्रगल्भ झालेली- बोलीला सामावून घेणारी भाषा समुद्राच्या जवळ गेलेल्या महानदीचं रूप घेत शांत आणि संथ होताना दिसून येते.

*मला दिसत नाहीच / पैलतीर- / आणि कापताही येत नाहीच / हे अथांग पाणी / पण या निरवानिरवीच्या / क्षणालाही / व्याकुळतोच जीव*

'कदाचित अजूनही'मधील कवितांमध्ये सतत एक ठसठसणारी नस आहे. भू, स्त्री आणि नदी; या सर्व सृजनाच्या साक्षीदार आहेत.

*पायाखालची / चिमूटभर माती / उचलून / मी कपाळावर लावते / आणि साजरा होतो / सृजनाचा उत्सव / नव्यानव्या ऋतूंना / जन्म देणारा*

अवैदिक देशीयता सहिष्णू असल्यामुळे अहिंसावादी आहे. त्यामुळे कवयित्रीला वर्तमान ऱ्हासशील काळात निसर्गामुळे दिलासा मिळतो आणि दुःखयुक्त जीवनात जगण्यासाठी आत्मविश्वास निर्माण होतो.

*झाडाखाली आसऱ्याला / येणाऱ्या जिवांना / खात नाहीत झाडं / अजूनतरी / पुरेसा असतो मला / एवढा दिलासा*

अनुराधा पाटील यांच्या कवितांमध्ये करुणा, दुःख, समग्र, माणूसपणाची घुसमट, वेदना आणि यातनेमुळे होणारा त्रास आहे. तरीही या कविता सोशिक आहेत. 'कदाचित अजूनही'मधील कविता समग्र स्त्रीजीवनाची, भूमिहीन शेतमजूर, शेतकरी, कामगार, उपरे, दलित, सर्वहारा, उपेक्षित, सर्व सुखांपासून दूर अशा माणसांच्या दुःखाला अभिव्यक्त करणारी आहे. आपली कविता नामशेष झालेल्या गावांच्या संस्कृतीची, मुक्या-बहिऱ्या-अपंग माणसांची आणि आईपणाची भाषा बनली, असे कवयित्रीला वाटते. तिला दारिद्र्याचे आणि दुःखाचे संदर्भ प्रागैतिहासिक काळापर्यंत मागे नेतात आणि आदिम करुणेशी जोडतात.








*आपल्याला नव्हती लिपी / आपली भाषाही नव्हती / नव्हता कसला उच्चार / आपल्या तोंडी इतरांसाठी / आणि अजूनही / आपल्या भूर्जपत्रांवर / पसरून आहे काळोख / नशिबासारखा / जिथं साक्षात भूक बनून / वणवण फिरली भाषा / आणि घट्टे पडलेल्या हातांनी / चितारली गेली / डोंगरदऱ्यांच्या भिंतीवर / मुका इतिहास होऊन*

हा मुका इतिहास नकाशावर न सापडणाऱ्या गावांच्या माणसांचा आहे. अनुराधा पाटील यांच्या कवितेत वृद्धाश्रमातील बेदखल जीव, गुरं राखणारी मुले, हुंड्यापायी जळालेल्या मुली, माणसाच्या वाळून गेलेल्या संवेदना, दृश्यांचा भाग होऊनच सामोरी येणारी माणसं आणि माणूसपणाचं विरलेलं अस्तर आहे.

या कवितांमध्ये साधी सपक आयुष्य जगणारी बिनचेहऱ्याची बाई, शाळेच्या पायरीवर गुमसुम बसलेला, निवडुंगाचं चित्र रंगवणारा, रस्ता ओलांडताना विश्वासानं बोट पकडणारा, अशी मुलं आहेत. रस्त्यावर पडलेला एखादा बेनाम जीव, परागंदा होण्याच्या वाटेवरला माणूस, मुशाफिरी करणारा थोरला भाऊ, लहान भावंडाला कडेवर घेऊन कुडाच्या भिंतीला टेकून उभी असलेली निराधार मुलगी, भिंत चाचपडत चालणारी म्हातारी माय, गावातील म्हातारी स्त्री, फाटलेल्या सदऱ्यात कुडकुडणारा बाप, 'बगळ्या बगळ्या कवडी दे' असं म्हणणारी एखादी मुलगी, चुपचाप डोळे पुसणारी सासुरवाशीण आणि म्हातारी आदिमायाच जणू अशी स्त्री आहे. ही कविता भूकबळी ठरलेले लोक, मरून गेलेली निष्पाप मुलं, निंदणी-खुरपणी करणाऱ्या मग्न बाया, ज्यांची पाटी फुटलेली आहे अशा हरवलेल्या मुलांची, सुकलेल्या स्तनांना लुचणाऱ्या बारीक लेकरांची, रेल्वे फलाटावर चादरीनं चेहरा झाकून झोपलेल्या, स्वप्नातही चेहरा नसलेल्या आणि उपेक्षित सडकेच्या काठावरून उठून गेलेल्या माणसांची, निर्वासित लोकांच्या दुःखाची आणि माफीनामा मागणाऱ्या सर्वसामान्य माणसांची कविता आहे.

अनुराधा पाटील यांच्या कवितांमध्ये समग्र संग्रहाला स्पर्श करणाऱ्या केंद्रीभूत अशा खालील काव्यओळी आहेत-

*कदाचित अजूनही / जगण्याला अर्थ असेल / पण नावानिशी जगण्याचं / स्वातंत्र्य / संपूर्ण गहाळ होताना / करता येत नाहीय मला / वाळूत तोंड खुपसून / सुटकेचा देखावा*

त्यांच्या कवितेत थोडासा उजेड मागाय आलेली अश्राप पोरगी; चेहरा हरवलेली, दुःखाला सोबत घेऊन चालत जाणारी माणसं आणि;

*परागंदा होण्याच्या वाटेवर / उभा असलेला शेवटच्या रांगेतला / शेवटचा माणूस*

- आहे. सूर्य पाठीवर घेऊन चालणारे लोक, घरदार गमावून भणंग भटकणारा पोरका पोर आणि फुलपाखरामागे धावणारा अश्राप डोळ्याचा मुलगाही आहे. दुःख आणि दुःखाच्या मुळांचा शोध घेऊन त्याच्या नायनाटाची कारणमीमांसा करणारा महाकारुणिक गौतमबुद्ध कवयित्रीला जवळचा वाटतो. म्हणून त्या म्हणतात,

*१) या जन्मातलं आपलं कार्य / संपलं आहे भगवन् / आता निर्वाणाची वाट / आपलीशी करावी / पाहावा थोडा / चराचराशी अलिप्त होऊन / मृत्यूच्या खोल काळोख्या नदीत / हळूहळू बुडत जाणारा / आपला कलेकलेचा चंद्र / उतरून ठेवावं काठाशी / त्वचेचं / विरत चाललेलं काषाय वस्त्र /*

*२) महाकारुणिका / मला करता येऊ दे / मृत्यूच्या विराट शून्याला / हलकासा स्पर्श / ठेवता येऊ दे / सृजनालाही / माणसाच्या रांगेत / मानवी अस्तित्व, दुःखं आणि अंतिम सत्य*

मृत्यूचं भान ठेवणारी अनुराधा पाटील यांची कविता आहे. स्वतःच्या वैयक्तिक दुःखाला त्या समष्टीच्या महादुःखसागरात विलीन करतात. त्यांची कविता आपलं जमिनीशी असलेलं नातं कधीही विसरत नाही.

*आणि मृत्यूचं विराट शून्य / झपाट्यानं विस्तारत / जवळ जवळ येतंय सतत*

हे वास्तवाचं भान आणि मृत्यूचं चिंतन वैचारिकदृष्ट्या प्रगल्भ आणि सजग बनवून जातं. 'मी सोडवते' या कवितेतील या ओळींबरोबरच 'हे असंच होतं,' 'उलटताहेत नुसतीच' आणि 'खुशाल येऊ दे' या कवितांमधूनही मृत्यूबद्दलच्या जाणिवा प्रकट झाल्या आहेत. उदा.

*१) फक्त देता येऊ दे तेव्हा / जन्मापासूनं आतल्या काळोखात / पाकळीपाकळीनं उमलत गेलेल्या मृत्यूच्या / पापणी नसलेल्या / डोळ्याला डोळा*

*२) की तसा / काहीच फरक पडणार नाही आता / कुठल्याही मातीत / मिसळून जाण्यासाठी / चुपचाप तयार होताना / तेल संपत आलेल्या / वातीची तडतड तर / आतूनच जाणवतेय / कधीपासून / तिलाही मलाही*

*३) आणि खुशाल येऊ दे मग / अशा स्वतःचा / मरणगंध हवेलाही*

> अनुराधा पाटील यांच्या कवितांमध्ये समग्र संग्रहाला स्पर्श करणाऱ्या केंद्रीभूत अशा खालील काव्यओळी आहेत- ''कदाचित अजूनही / जगण्याला अर्थ असेल / पण नावानिशी जगण्याचं / स्वातंत्र्य / संपूर्ण गहाळ होताना / करता येत नाहीय मला / वाळूत तोंड खुपसून / सुटकेचा देखावा'' त्यांच्या कवितेत थोडासा उजेड मागाय आलेली अश्राप पोरगी; चेहरा हरवलेली, दुःखाला सोबत घेऊन चालत जाणारी माणसं आणि: ''परागंदा होण्याच्या वाटेवर / उभा असलेला शेवटच्या रांगेतला / शेवटचा माणूस'' - आहे. सूर्य पाठीवर घेऊन चालणारे लोक, घरदार गमावून भणंग भटकणारा पोरका पोर आणि फुलपाखरामागे धावणारा अश्राप डोळ्याचा मुलगाही आहे. दुःख आणि दुःखाच्या मुळांचा शोध घेऊन त्याच्या नायनाटाची कारणमीमांसा करणारा महाकारुणिक गौतमबुद्ध कवयित्रीला जवळचा वाटतो.

मृत्यू हा मानवी जीवनातील न टाळता येणारा आणि कोठेही येणारा क्षण किंवा अंतिम प्रसंग. त्यावद्दलचे विचार 'कदाचित अजूनही' मधून संयतपणे अभिव्यक्त होतात.

अनुराधा पाटील यांच्या कवितांचं महत्त्वाचं वैशिष्ट्य म्हणजे, त्यांची कविता वास्तवाला सामोरी जाणारी आणि जगण्यासंबंधी सतत चिंतन करत संवाद करणारी व जगणे महत्त्वाचे असं म्हणणारी कविता आहे.

उदा -

*१) आणि जगण्यामागची / सुन्न शांतता*

*२) तुझा जीव जगण्याच्या / या निरर्थक पसाऱ्यात*

*३) आणि जगणं तोलून धरेल / अशा खांबांचीच वानवा*

*४) जगणं वाट्याला आलं तरी*

*५) जगण्यावर जडलेला / जीवघेणा लोभ*

*६) तू दिलेल्या जगण्याची / सृजनसूत्रं*

*७) जीव मुठीत धरून / जगावं लागणाऱ्यांच्या / या जगात*

*८) ऐन जगण्यासारखं माणूसपणाचं / विरलेलं अस्तर*

*९) जगणं मार्गी लागेल / पुन्हा सगळ्यांचं*

*१०) की नम्र असेल / शरणभावाने / जगण्याच्या संदर्भात*

*११) जगण्याच्या नितांत निकडीत*

*१२) हे आयुष्य जसं आपण / जगलेलोच नाही*

*१३) हरवून गेली आहे / कधीपासून /*
*जगण्याच्या नितांत निकडीत*

*१४) करड्या पहाऱ्याखाली / गुदमरून जाणारं जगणं*

*१५) आणि ठेवतोस अल्हाद / तुळशीपत्र / आमच्या जगण्यावर*

मानवी अस्तित्व आणि जगणे, जगण्यातील पेच अधोरेखित करणारी कविता 'कदाचित अजूनही' मधून येते. त्यांच्या कवितांमध्ये व्याकूळता, असहाय्यता आणि उदासीनता यांचं मिश्रण आढळतं.

अनुराधा पाटील यांच्या कवितांमध्ये चांगदेव, कर्ण, वामन, पुंडलिक, जनाबाई आणि अश्वत्थामा यांचे मिथ्स सापडतात. त्यांच्या कवितेत अबीरगुलाल, अळूमाळू, वृक्षवल्ली, वाळवंटी असे अनेक शब्द येतात म्हणून 'कदाचित अजूनही' या संग्रहाची भाषा नामदेव, ज्ञानदेव, जनाबाई आणि तुकोबाराय या संतांच्या भाषेशी सलगी करते. त्यांच्या कवितेत लोकदेव विठ्ठल आणि शेतकरी यांचे संदर्भ येतात.

हिरवा राया, लाघव, आचवले, सूर्यफुलांच्या, सांज. काळझोप, किणकिणत्या, सळसळता, लवलवती. झिळमिळ, टपटप, रेशीमकोष, काळोखा कोपरा, आयुष्याचे पान, मनावर साचत जाणारी काजळी असे काव्यात्म शब्द आणि प्रतिमा यांमुळे कवितेची भाषा समृद्ध झाली आहे. पसायदान, लोकगीते, म्हणी, वाक्प्रचार, संत आणि लोकभाषेचे संस्कार अनुराधा पाटील यांच्या कवितेवर झाले आहेत.

उदा. -

*१) (पसायदान)*

*पण दूरवर दिसणाऱ्या / उजेडाचं / एक टोक धरून चालताना / निदान भविष्यात / तुमच्या घराला अंगण असो / लेकी बागडण्याएवढं / असो एखादं झाड / दारासमोर मुळं धरून / माथ्यावर ढाळण्याएवढं / आणि लाभो / तुमच्या नांदत्या घराच्या / वाशांना बळ*

*२) (संत आणि लोकभाषा)*

*मी माझी सावलीही / पडू देत नाही आजकाल / कुणाच्या वाटेवर / आणि प्रत्येक गोष्टीतून / समूळ हद्दपार होण्याचे / हे दिवस स्वीकारतेय / एका अटळ जाणिवेनं / चाल माझ्या रायो / डोंगरी दिवा लागो*

म्हणत म्हणत.

संत तुकोबाराय यांच्या 'चाल माझा राघो /... लागो' या अभंग ओळींना काळाच्या ओघात लोकोक्ती अर्थात लोकभाषेचे रूप मिळाले. जनभाषेत या ओळी गद्यप्राय आणि लोकगीताच्या अंगानेही आज उच्चारल्या जातात. साधारणतः ३८० सालांपूर्वी निर्माण झालेल्या वरील शब्दांचा; अभंग, लोक, जनभाषा, लोकोक्ती, लोकगीत असा प्रवास कवितेत येऊन एकरूप होतो. तुकोबांच्या अनेक उक्ती आज लोकभाषेत रूढ झाल्या आहेत. वरील सौरी अभंग भारूडाचे रूप घेऊन येतो.

अनुराधा पाटील यांची कविता भीती, अस्थिरता, आणि अनिश्चितता यांना शब्दबद्ध करते. त्यांच्या कवितेतील दुःखाची धारा स्त्रीजीवनाकडून व्यापक होत शेतकरीवर्गाकडे जाते आणि समग्र गाव पांढरीला वेढत महापुराचं रूप घेते.

*- घराचे चिरे ढासळताना / विटेवर वीट रचण्याचा / नुसता आभास वेढतो / गळ्याला फास लावत / आणि खचत जातो पाया / अधिक खोलात / गावपांढरीचा*

कवयित्रीला वर्तमानकाळात शेतकरी आत्महत्यांचं सूत्र सतत वाढताना दिसून येतं. तिला हरणारी, शिणलेली आणि वाताहत झालेली अन् पिचलेल्या मनांची माणसं दिसतात; ती कधीही पूर्ण न होणारी स्वप्नं पाहतात.

*त्यांच्या उजाड गावठाणात / वावरते अधूनमधून / दिवसाउजेडी / कोल्ह्याकुत्र्यांची वीण / आणि गावकुसाच्या परिघावर / मुकाट बसून / ते वाट पाहतात / फाटत चाललेला सातबारा / कोरा होण्याची*

अशा हतबल झालेल्या माणसांच्या दुःखाची गाथा म्हणजे 'कदाचित अजूनही' मधील कविता. उपरेपणा आणि वाताहतीचा जाच भारतीय स्त्रीला सहन करावा लागतो. दुःखाचा प्रवाह समुद्राजवळ येताच महानदीचं रूप घेतो. जीवनाची ही नौका आपलं अस्तित्व मागं ठेवते; कवितेच्या रूपात.

*जगाच्या कानाकोपऱ्यात / कुठंतरी / वाचली जाईल माझी / एखादी तरी ओळ / की तिथंही असेन मी / इतरांच्या परिघाबाहेर / आपल्याच मौनाला / कानाशी लावून / चुपचाप... खिन्न*

ही स्तब्धता बरंच काही सांगत मौनाला अधोरेखित करणारी आहे.

कवी ना. धों. महानोर यांच्या सन्मानार्थ ठेवलेला 'रानगंध' पुरस्कार स्वीकारताना अनुराधा पाटील म्हणतात, ''या पुरस्काराचं महत्त्व मला यासाठीही वाटतं की, हा पुरस्कार माझ्या परिसरातला आहे. मी तिथल्याच गावशिवेची मुलगी आहे. तिथल्याच परिसरात मी लहानाची मोठी झालेय. तिथली माणसं सतत माझ्या कवितेत वावरत आली आहेत. तिथं रुजलेली माझी मुळं आतून तशीच आहेत; जी शांतपणानं तिथली ओल पीत मला उभं करत आली आहेत. तिथल्या रानावनात माझ्या आईच्या असंख्य आठवणी सांडल्या आहेत. या वाकोर आणि पळसखेडच्या जंगलात आजही तिच्या पावलांचे ठसे कुठे तरी असतील. तसंही दोन-तीन एकर कोरडवाहू शेती असलेल्या शेतकऱ्याला दुसऱ्यांच्या शेतातली मजुरी तेव्हाही चुकत नव्हतीच. दुष्काळ आणि नापिकी या एकाच नाण्याच्या दोन बाजू तेव्हाही होत्याच, आज त्याच्याहीपेक्षा वाईट अवस्था आहे.

माझ्या आजूबाजूला असलेला समाज तेव्हाही अभावग्रस्त आणि जिवंत राहण्यासाठी संघर्ष करत असणाराच होता. जात-पात, धर्म या गोष्टींचा अडथळा तसाही दारिद्र्याला कधीच नसतो; पण कष्ट करत भविष्याकडे बघत तिथल्या अनेक पिढ्या माझ्या आईवडिलांसारख्याच तिथल्या मातीत मिसळून गेल्या आहेत.'' (पंचधारा, तत्रैव, पृ. ४९-५०)

वरील उताऱ्यातून कवयित्री अनुराधा पाटील यांच्या गावाकडचा परिसर, भाषा, आईवडिलांची गरिबी, वातावरण, संस्कृती आणि कवितेच्या मुळांचा उलगडा होतो; दुःखाच्या निर्मितीची कारणे सापडतात. अर्थात, त्यांच्या 'कदाचित अजूनही' मधील कविता क्षमा, समता, अहिंसा आणि समंजसपणा या मूल्यांचा उद्घोष करताना दिसून येतात.

•

**डॉ. विलास पाटील**
'अभंग', शारदानगर, जिंतूर,
जि. परभणी, ४३१ ५०९
चलभाष : ९८६०८७५३२२
spvilasrao@gmail.com





कवी

**प्रा. डॉ. शैलेश त्रिभुवन यांचे**
**लौकीक प्राप्त आणि राज्यस्तरीय काव्यपुरस्कार**
**सन्मानित दोन कविता संग्रह सर्वत्र उपलब्ध**



## आई! तू होतीस तेव्हा

पृष्ठे १५६, किमंत १००



प्रकाशिका : सुनिता शैलेश त्रिभुवन
**मो. : ९९२२१ ३०१५७, ७८८८२ ६२३१०**



## अस्वस्थ मनातील शब्द

पृष्ठे १०४, किमंत १००

लेखक, समीक्षक, संपादक अशा विविध भूमिका करत मराठी साहित्यात स्वत:ची मुद्रा उमटवू पाहणाऱ्या प्रा. डॉ. शैलेश त्रिभुवन यांनी कवितेच्या प्रांतातही आपले दमदार पाऊल टाकले आहे. मातृभक्त असलेल्या त्रिभुवन यांनी कवितांसाठी अतिशय आगळावेगळा विषय निवडला आहे. तो म्हणजे आपल्या आईचं आयुष्य.

**मा. उत्तम कांबळे (कवी, लेखक, विचारवंत, संपादक)**

मराठी साहित्याच दालन समृध्द करणारा कवितासंग्रह! कवीचा हा वेदनेशी सवाद आहे. जणू आईच्या समोर बसून तिलाच तिचा जीवनवृत्तांत ऐकवत आहेत! वाचणाला खिळवून ठेवणारी ही कलाकृती आहे.

**मनोहर रणपिसे (गजलकार)**

आई विषयीच्या भावोत्कटतेचा स्पर्श या रचनेला झाला आहे. तुम्ही लिहिलेले हे आईचे लीळाचरित्र आहे. महानुभाव गद्याने चौदाशे वर्षापूर्वी मराठीत सुप्रतिष्टीत केलेला 'लीळा' हा वाङ्मयप्रकार इतक्या वर्षानंतर तुमच्या या रचनेमधून पुनरुज्जीवित झालेला आहे.

**प्रा. डॉ. निशिकांत मिरजकर (दिल्ली)**

कवी शैलेश त्रिभुवन यांची आई तर बुध्दाच्या करुणेला कवेत घेणारी सारी दु:ख झेलून निरामय आनंद देणारी, आयुष्याच्या अखेर पर्यंत वेदनामुक्त होण्याच्या आशेने वेदनाच टोचून घेणारी, आज आई नसल्याची तीव्र खोच कवी मनात आहे. म्हणूनच कवी भाव संवेदना व्यक्त करतात.

**प्रा. डॉ. गंगाधर पानतावणे (औरंगाबाद)**

आपल्या वर्तमानातल्या कठोर वास्तवाच्या तळाशी शैलेशने आपलं बालपण आपला संघर्षाचा वेदणामय काळ आणि क्षणाक्षणाला आधार देणारा आई-वडिलांचा जिव्हाळा त्यांनी हळूवारपणे जपून ठेवलेला आहे. एरवी शैलेशच्या सहवासात शैलेशच्या व्यक्तिमत्वांचा जाणवणारा हा पैलू त्यांच्या आई! तू होतीस तेव्हा! या कवितासंग्रहात मला प्रकर्षाने जाणवला.

**प्रा. दत्ता भगत (औरंगाबाद)**

आई! तू होतीस तेव्हा हा आई विषयीच्या कवितांसाठीचा कवितासंग्रह वाचायला काव्यकार म्हणून तुम्ही तुमची जबावदारी छान पेलली आहे. खर म्हणजे त्रिभुवन कुटुंबाचीच संपूर्ण काव्यकथा या संग्रहातून उलगडत जाते आणि हे सार फार भावनाविवश न करता होता शब्दांकित करण मोठं जोखमीच होतं यात तुम्ही यशस्वी झालात म्हणून पुन्हा एकदा अभिनंदन!

**प्रेमानंद गज्वी (मुंबई)**

या कवितासंग्रहानील अस्वस्थता कवीच्या शब्दांचे अर्थचारित्र्यच बदलून टाकते आशय भाषेतीच्या आगीत होरपळून निघालेला आहे किंवा वर्तमानातील विविध आवाजांचे आक्रंदनच या कवितासंग्रहात पवसाळून आलेले आहे असे म्हणता येते. कवीच्या अनित्यवान नजरेत हे स्वप्न आहे आणि त्याच्या अस्वस्थ शब्दांनी या स्वप्नाच्या हाताने नवा इतिहास लिहिल्याचा निर्धार केला आहे.

**डॉ. यशवंत मनोहर (नागपूर)**

कवितासंग्रहाचे शीर्षक पाहता त्यातील अस्वस्थता ही एकट्या शैलेश त्रिभुवन यांची नाही, तर ती आजच्या समकाळात कोंडल्या गेलेल्या सामाजिक समतेसाठी लागणाऱ्या प्रत्येक माणसाची आहे. लोकशाही आणि वास्तवात लपलेला मूलतत्त्ववाद यातील विसगती ही सतत मनाला बोचणारी आहे. त्यामुळे ही कविता कवीच्या मनातील दबलेले विषमतेचे हुंकार आहेत.

**प्रा. डॉ. बाळासाहेब लबडे (गुहागर)**

अस्वस्थ मनातील शब्दांनी मूल्यांचा व विवेकाचा जागर केलेला आहे. विषमते विरुध्द कवीने आवाज उठवून सामाजिक समतेचा आग्रह धरलेला आहे. या निर्मितीच्या काळात मी स्वत:ला भाजून घेत होतो. या अर्थाने डॉ. त्रिभुवन यांची कविता सामाजिक बांधिलकी मानणारी कविता आहे.

**प्रा. डॉ. सुभाष आहेर (अहमदनगर)**

डॉ. त्रिभुवन यांच्या त्या संगाचा प्रत्यय या संग्रहातून येतो. क्रांती सूर्य डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या कर्तृत्वावरील श्रध्दा देखील येथे प्रत्ययास येते विशिष्ट भूमिका स्वीकारून निर्भयतेने समकालीन वास्तव मांडत जाणे, स्वजनांची कृतघ्नता सडेतोड मांडणे, व्यसंग इ. अंगाने ही कविता लक्षणीय आहे.

**प्रा. डॉ. फुला बागुल (शिरपूर)**

तथागथ गौतम बुध्दांचा विचार अंगिकारणे हा एकमात्र उपाय कवी प्रत्येक कवितेतून सुचवितो. आंबेडकरी काव्य प्रांतातील एक आशादायी. प्रेरणादायी कवी म्हणून त्यांचे निश्चित स्वागत होईल. त्यांच्या इथून पुढच्या काव्य निर्मितीसाठी हार्दीक शुभेच्छा!

**प्रा. डॉ. सुनिल चंदनशिवे (कोल्हापूर)**

मुखपृष्ठावरच चित्र आणि काव्यसंग्रहाच शीर्षक यांचा सुरेख मेळ घातला असल्याचा प्रत्यय आला अस्वस्थ मानवी मनाला तथागथ गौतम बुध्दाच्या सम्यक विचारात उत्तर आहे. कवितेच्या केंद्रस्थानी माणूस आहे. आंबेडकरी जाणिवेतली कविता अधिक प्रगल्भ आणि सम्यक झाली आहे. अस वाटत.

**प्रा. मोहन शिरसाठ (वाशिम)**

इतिहास आणि वर्तमान यावर टोकदार भाष्य करणारी वास्तववादी कविता म्हणजे "अस्वस्थ मनातील शब्द" या काव्यसंग्रहातील कविता होय. त्यांच्या कवितेत कुठेही कल्पनाविलास नाही आणि त्यांच्या कवितेला उपमा-अलंकाराचा उसना सोस नाही. थेट भावना व भूमिका म्हणजे डॉ. त्रिभुवन यांची कविता होय.

**प्रा. डॉ. प्रतिभा जाधव (नासिक)**

**शब्दाली प्रकाशन**



अनुक्रमणिका



भाषण

डॉ. अरुणा ढेरे

# समग्रतेनं जगणं आणि समग्रतेनं समजून घेणंच संपत चाललंय!

**मौ**खिक वाङ्मयाची परंपरा ही फार प्राचीन आहे. किंबहुना मौखिक वाङ्मय हीच अभिजात साहित्यपरंपरेची जन्मदात्री आहे. हे वास्तव ध्यानात घेऊन लोकवाङ्मयाच्या आणि एकूणच लोकपरंपरेच्या गंभीर अभ्यासाला सर्व जगभर सुरुवात झाली, ती मुख्यतः गेल्या शतकात. महाराष्ट्रात एकोणिसाव्या शतकाचा उत्तरार्ध आणि नंतर विसाव्या शतकाचा पूर्वार्ध हा कालखंड म्हणजे लोक-साहित्याभ्यासाचा उदयकाळ होता, असं म्हटलं पाहिजे.

या काळातले द्रष्टे विचारवंत लोकपरंपरेकडे वळले त्यामागे संस्कृतीतलं मौखिक धन वेचावं, उजेडात आणावं ही प्रेरणा होतीच; पण लोककलाप्रकारांचं बळ स्वातंत्र्यलढ्यासाठी जनजागृतीच्या मागे उभं राहावं अशीही प्रेरणा होती. ही बहुजनांची परंपरा होती. त्यांनी निर्माण केलेली होती. म्हणून बहुजनांच्या हृदयाला हात घालण्याचं सामर्थ्य याच परंपरेकडे होतं. हे ओळखून महाराष्ट्रातला सजग स्वातंत्र्योत्सुक वर्ग लोकवाङ्मयाकडे आणि लोककलांकडे वळला.

कीर्तन-प्रवचन ही इथली पारंपरिक प्रचारमाध्यमं. त्यांचा मोठ्या प्रमाणावर वापर त्यासाठी झाला. शाहिरी कविता मेळ्यांमधून गाजू लागली. पौराणिक नाटकं समकालाचा संदर्भ सांगू लागली. लोककथांना सूचकतेचं सामर्थ्य प्राप्त झालं. अभिजात रंगभूमीवर नाटकाचा उदय झाला, तोच मुळी लोककलाप्रकारांचा आधार घेऊन.

एकीकडे लोकपरंपरा ही लोकसंपर्काचं आणि जनजागृतीचं प्रभावी माध्यम म्हणून पुढे येत असतानाच आणखी एका उद्दिष्टाची जोड त्याला मिळाली. स्त्रियांच्या उत्थानासाठी त्या काळी जे वेगवेगळे प्रयत्न सामाजिक, सांस्कृतिक क्षेत्रांत चालू होते, त्या प्रयत्नांना बळ देण्यासाठी लोकपरंपरा कामी आली. मध्ययुगातल्या सर्वार्थाने शोषित, वंचित, निराधार स्त्रियांनी तिच्याच आधाराने थोडा श्वास घेतला होता. तिचं महत्त्व ध्यानात आलं तेव्हा हे मौलिक धन उजेडात आणलं पाहिजे, असं जाणत्यांना वाटू लागलं.

त्यांच्याच उत्तेजनानं स्त्रीगीतं संकलित करण्याची सुरुवात झाली. या संकलनाच्या कामात राजवाडे, शंकरराव दाते, ना. गो. चापेकर, नांदापूरकर, साने गुरुजींपर्यंत अनेकांचं नामस्मरण जसं केलं पाहिजे, तसंच 'मानसगीतसरोवर' या नावाने तीन भागांत स्त्रीगीतं संकलित करणाऱ्या बेळगावच्या कृष्णाबाई गाडगीळ, 'स्त्रीगीतरत्नाकर' संकलित करणाऱ्या पार्वतीबाई गोखले आणि पुढे कमलाबाई देशपांडे, मालतीबाई दांडेकर आणि इतर स्त्रियांचं स्मरणही केलं पाहिजे.



डॉ. सरोजिनी बावर यांच्या संकलनकार्याचा विचार या कालपटावर करता येईल. एका बाजूला स्वातंत्र्योत्तर महाराष्ट्रातल्या राजकारणात सक्रिय सहभाग घेणाऱ्या अत्यंत मोजक्या स्त्रियांपैकी एक म्हणून त्यांची नोंद केली पाहिजे आणि दुसरीकडे त्या निमित्ताने निर्माण झालेल्या राजकीय संबंधांचा परिपाक म्हणून त्यांच्याकडे चालत आलेल्या लोकसाहित्यसमितीच्या सक्षम अध्यक्ष म्हणूनही त्यांच्या श्रेयाची नोंद घेतली पाहिजे. १९६१ ते





**महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, लोकरंग सांस्कृतिक मंच ठाणे, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ आणि राष्ट्रसेवा प्रतिष्ठान, बावधन, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने लोकसाहित्याच्या ज्येष्ठ अभ्यासक डॉ. सरोजिनी बाबर यांच्या जन्मशताब्दीनिमित्त आयोजित लोकसाहित्य संमेलन नुकतेच पुण्यात पार पडले. या संमेलनाच्या अध्यक्ष डॉ. अरुणा ढेरे यांचे अध्यक्षीय भाषण.**



१९९३ या ३२ वर्षांच्या दीर्घ कालखंडात या शासकीय समितीचं नेतृत्व करत महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांतून अनेकांच्या सहकार्याने मौखिक परंपरेचं धन त्यांनी मोठ्या प्रमाणावर वेचून आणलं. 'रानजाई' सारख्या दृक्-श्राव्य कार्यक्रमांमधून त्याला लोकप्रियता मिळवून दिली. साध्यासुध्या सामान्य माणसांना त्यांच्याजवळच्या लोकधनाचं मोठेपण समजावलं आणि मान्यवर अभ्यासकांची जोड घेऊन लोकसाहित्याच्या अभ्यासाला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. शासनाच्या पाठबळानं आणि अनेक उत्साही संकलकांच्या साहाय्यानं त्यांनी जे लोकसंचित जमा केलं, त्यातून पुढे उत्तरकालीन अभ्यासकांच्या कामाची संदर्भभरणी झाली.

त्यांचा काळ म्हणजे स्वातंत्र्यानंतरचा महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जडणघडणीचा काळ. या काळात विशेषतः १९६० नंतर जगभरातच लोकविद्येच्या अभ्यासाला पुन्हा नवी प्रतिष्ठा प्राप्त झाली आणि दलितांकडे, स्त्रियांकडे तशीच लोकसंचिताकडे पाहण्याचीही नवी दृष्टी मिळाली. ही दृष्टी घेऊन काम करणाऱ्या दुर्गाबाईंनंतर तारा भवाळकर, तारा परांजपे या जशा आहेत तशा मिथकांच्या, जनजीवनाच्या, सांस्कृतिक मूलाधारांच्या नव्या आलोकात लोक-नागर परंपरांचा विचार करणाऱ्या प्रतिमा इंगोले, जयंती नायक, शैला लोहिया, सिसिलिया कार्व्हालो, कविता महाजन आणि इंदिरा संतांसारख्या आणखीही काही लेखिका आणि अभ्यासक स्त्रिया आहेत.

लोक संस्कृतीच्या पुरुष अभ्यासकांपेक्षा एक वेगळा सहृदय आस्थेचा आणि स्त्री-जीवनाविषयीच्या समजुतीचा जो अंतःस्वर गेल्या ५० वर्षांतल्या आम्हा लेखक-अभ्यासक स्त्रियांपैकी बऱ्याच जणींच्या मांडणीत आणि विवेचनात आहे तो मला महत्त्वाचा वाटतो. अभ्यासाच्या शास्त्रीय बांधणीला आणि अलिप्ततेच्या मागणीला ओलांडून हा स्वर आमच्या लेखनात उमटला आहे. दुर्गाबाईंनी तर महाराष्ट्रातल्या लोकसाहित्याच्या अभ्यासाची शास्त्रीय पायाभरणीही केली आणि लोकसंस्कृतीच्या अनेक लहान-मोठ्या विधांकडे आपले लक्ष वेधून घेत या अभ्यासाविषयीची आपली दृष्टीही समृद्ध आणि व्यापक केली.

मुळात दुर्गाबाई आदिवासी लोकजीवनाचा आणि नंतर व्यापक लोकसंस्कृतीचा अभ्यास करायला लागल्या तो काळच पाहा ना! १९३०-३५ चा काळ. त्या काळात विशी-पंचविशीतली तरुण मुलगी उठते आणि मध्य प्रदेशातल्या आदिवासींमध्ये हिंडून त्यांच्या संस्कृतीचा अभ्यास करायला लागते ही गोष्ट नुसत्या धाडसाचीच नव्हे, तर अपूर्वाईचीही वाटते; पण स्त्री-पुरुष भेदांच्या पलीकडे अभ्यासक म्हणून जाण्याची ताकद दुर्गाबाईंमध्ये होती आणि तरीही बायकांचं जगणं समजून घेण्याची उत्कटता आणि पिंडधर्मातूनच आलेली सहानुभूतीही त्यांच्याकडे होती. म्हणून एकूण लोकसाहित्य आणि संस्कृतीचं आलोकन तर त्यांनी केलंच; पण त्याच्या जोडीनं त्यांनी बायकांकडून सांभाळल्या गेलेल्या कितीतरी कलांचं, हस्तोद्योगांचं आणि मौखिक वाङ्मयाचं महत्त्व आपल्या लक्षात आणून दिलं.

बायकांच्या तोंडच्या नुसत्या ओव्याच नव्हे, तर म्हणी, वाक्प्रचार, लग्नगीतं, खेळाची गाणी, सण-वार, भरत-काम, विणकाम, स्वयंपाक आणि इतर पदार्थ-दुर्गाबाईंना या बायकांनी जपलेल्या कलांविषयी नितांत प्रेम आणि आस्था होती. त्यांचा आणखी एक मोठा विशेष म्हणजे लोककलावंत स्त्रियांविषयी त्यांना असलेला जिव्हाळा आणि त्यांच्या प्रश्नांविषयी त्यांना जाणवणारी कळकळ.

दत्तो वामन पोतदारांच्या अध्यक्षतेखाली असलेल्या, शासनाच्या तमाशा सुधार समितीच्या दुर्गाबाई ह्या एक सदस्या होत्या आणि तमाशातल्या बायामाणसांसाठी कोर्टात उभं राहण्याची वेळ आली तेव्हा विनासंकोच दुर्गाबाईंनी तेही काम केलं होतं. पांढरपेशा समाजात,



अनुक्रमणिका



प्रतिष्ठित उच्चवर्णीयांच्या घराच्या ओसरीवर, तथाकथित हलकी, नाच-गाणं करणारी बायामाणसं एखाद्या अविवाहित, सुरेख बाईकडं येणं हे त्या काळात जेवढं धक्कादायक होतं त्यापेक्षा अधिक आश्चर्यकारक मला वाटतं, ते म्हणजे दुर्गाबाईंनी तमाशा कलावंतांची सुखदुःखं समजून घेणं आणि वेळप्रसंगी त्यांच्यासाठी जाहीरपणे कोर्टात उभं राहणं.

लोककलावंतांची, त्यातही कलावंत बायांची जगण्याची लढाई दुर्गाबाईंना महत्त्वाची वाटत आली आणि ती महत्त्वाची होतीच. मला आठवतं आहे की, विठा भाऊ नारायणगावकर एकदा आमच्या लोकसाहित्य परिषदेच्या व्यासपीठावर सादरीकरणासाठी आल्या तेव्हा त्यांच्या अंगात अडीच-तीन ताप होता; पण तशातही त्या आल्या, त्या नाचल्या आणि त्यांनी त्यांच्या पद्धतीनं त्यांच्या सादरीकरणाचं विश्लेषणही केलं. 'आम्ही तमाशा जगणाऱ्या बायका आहोत, नुसत्या नाचणाऱ्या नाही', असं त्या म्हणाल्या होत्या. अखिल भारतीय दलित नाट्य संमेलनाचं अध्यक्षपद त्यांना मिळालं तेव्हा बोलताना विठाबाईंनी त्या वेळच्या भाषणात मांडलेला एक मुद्दा खरोखरच फार महत्त्वाचा आहे आणि तो केवळ तमाशा कलावंतिणींच्या बाबतीतलाच नाही, तर एकूणच लोकपरंपरेतल्या कलावती बायकांच्या संदर्भात महत्त्वाचा आहे. मग त्या तमाशात नाचणाऱ्या कलावंतिणी असोत, गोंधळ-जागरणात सहभागी होणाऱ्या मुरळ्या असोत की, दक्षिणी मंदिरांमधून देवाची सेवा म्हणून नाचगाणं करणाऱ्या देवदासी असोत- त्यांनी जीवनधर्म म्हणून स्वीकारलेली, निष्ठेनं सांभाळलेली त्यांची कला आणि त्या कलेसाठीच जगणाऱ्या त्या कलावती यांना मात्र समाजात प्रतिष्ठा नाही, त्यांच्या वाट्याला अवहेलना आहे, दुःख आहे, उपेक्षा आणि गौणत्व आहे; पण तीच कला त्यांच्यापासून तोडून घेऊन नागर संस्कृतीनं उचलली, तर तिला एकदम प्रतिष्ठा आहे, सन्मान आहे, मान्यता आहे आणि वलयही आहे.

नागर संस्कृतीनं आणि पर्यायानं समाजातल्या उच्च, बुद्धिजीवी परंपरेनं जे सत्ताकारण केलं आहे त्याचा बळी ठरलेल्यांचे हे आवाज आहेत, हे सवाल आहेत.

मला इथे 'भरतनाट्यम्'शी संबंधित एका जुन्या वाद-विवादाचा गिरीश कार्नाड यांनी केलेला उल्लेख आठवतो. रुक्मिणीदेवी अरुंडेल यांनी राष्ट्रीयच नव्हे, तर आंतरराष्ट्रीय पातळीवर प्रतिष्ठित केलेल्या आणि भारतीय कलाजगतात मानाचं स्थान प्राप्त केलेल्या भरतनाट्यम् या नृत्यप्रकाराचं मूळ म्हणजे दक्षिणेतल्या देवदासींनी शतकानुशतकं ज्याची उपासना केली ते सादिर नावाचं नृत्य. इ. कृष्ण अय्यर हे दक्षिणेतले कलामर्मज्ञ २० व्या शतकाच्या मध्यात सादिर वाचवण्याच्या प्रयत्नात होते.

राजाश्रय संपलेला. संस्थानं खालसा झालेली, देवस्थानांमधून देवदासींची नेमणूक बंद झालेली आणि डॉ. मुथ्थुलक्ष्मी रेड्डींसारख्या सामाजिक कार्यकर्तीच्या प्रयत्नांमुळे देवदासीविरोधी कायद्याला मान्यता मिळालेली. अशा वेळी दक्षिणेतल्या देवदासी अक्षरशः रस्त्यावर येण्याची वेळ आली. त्या वेळेपर्यंत गाणं किंवा नाचणं हा बहुतेकींचा धंदा बनलेला नव्हता. त्यावर त्यांची उपजीविका होत होती खरी; पण त्यांच्यासाठी अगदी विठाबाई नारायणगावकर म्हणाल्या तशी ती कलेची सेवाच होती, देवाची उपासनाच होती. कायद्यानं त्यांना अप्रतिष्ठित बनवलं आणि त्यांच्या जगण्याचं नुसतं साधनच नव्हे, तर उद्दिष्टही त्यांच्याकडून हिरावून घेतलं.

आणि दुसरीकडे इ. कृष्ण अय्यरांनी कलाप्रकार म्हणून तरी सादिर जपायला हवं यासाठी मद्रास संगीत अकादमीच्या व्यासपीठावर सादिरचं सादरीकरण आयोजित करून मद्रासच्या प्रतिष्ठित कलाप्रेमींसमोर त्याचा प्रयोग घडवला. ठिणगी तिथे पडली आणि रुक्मिणीदेवी अरुंडेल यांनी सादिर शिकून, ते भरतमुनींच्या नाट्यशास्त्राशी जोडून, त्याला नवा सौंदर्यात्म आयाम दिला. सादिर लोकपरंपरेपासून तुटलं, देवदासी बाजूला पडल्या आणि भरतनाट्यम् हे नृत्य मात्र जगभरातल्या अभिजनांच्या कौतुकाचा आणि सन्मानाचा विषय झाला.

या वस्तुस्थितीवर बोट ठेवून लोककलावतींचं दुःख आणि तळतळाट त्या काळी बाल सरस्वतीसारख्या मान्यवर कलावंतीनं राष्ट्रीय पातळीवर व्यक्त केल्याची नोंद गिरीश कार्नाडांनी केली आहे. बेंगलोर नागरत्नम्‌सारख्या त्या काळच्या गाजलेल्या देवदासी गायिकेनंही फार तळतळून अभिजनांनी केलेल्या या अन्यायाविषयीची तक्रार जाहीरपणे केली होती.

हे केवळ सादिरसारख्या लोकपरंपरेतल्या नृत्याबाबत घडलं असं नाही. लोकसंगीत हे तर त्याचं सर्वांत मोठं उदाहरण आहे. एखादी गुलाबबाई नौटंकीवाली आज तुम्हा-आम्हाला फारशी माहीतही नाही. १९५० ते ६० च्या दरम्यान एच.एम.व्ही.नं तिच्या ८ रेकॉर्ड काढल्या आणि तिची गाणी उचलून पुढे सिनेमावाल्यांनी व्यवसाय केला. 'नदी ना रे ना जाओ, श्याम पैंया पडू', हे 'मुझे जीने दो' या

> एखादी गुलाबबाई नौटंकीवाली आज तुम्हा-आम्हाला फारशी माहीतही नाही. १९५० ते ६० च्या दरम्यान एच.एम.व्ही.नं तिच्या ८ रेकॉर्ड काढल्या आणि तिची गाणी उचलून पुढे सिनेमावाल्यांनी व्यवसाय केला. 'नदी ना रे ना जाओ, श्याम पैंया पडू', हे 'मुझे जीने दो' या चित्रपटातलं गाणं किंवा 'पान खाओ सैंय्या हमारो' हे 'तिसरी कसम' चित्रपटातलं गाणं जिच्याकडून उचललं गेलं त्या गुलाबबाईला ना त्या गाण्याचं कुठं श्रेय मिळालं, ना ते उत्तर भारतातल्या लोकसंगीताला मिळालं ना तिच्यासारख्या खेड्यापाड्यातल्या अनाम कलावंत वायकांना मिळालं. सिनेमे गाजले, गाणी गाजली, गुलाबबाई नौटंकीवाली मात्र बाजूलाच राहिली.

चित्रपटातलं गाणं किंवा 'पान खाओ सैंय्या हमारो' हे 'तिसरी कसम' चित्रपटातलं गाणं जिच्याकडून उचललं गेलं त्या गुलाववाईला ना त्या गाण्याचं कुठं श्रेय मिळालं, ना ते उत्तर भारतातल्या लोकसंगीताला मिळालं ना तिच्यासारख्या खेड्यापाड्यातल्या अनाम कलावंत वायकांना मिळालं. सिनेमे गाजले, गाणी गाजली, गुलाबबाई नौटंकीवाली मात्र बाजूलाच राहिली.

अर्थात ही प्रक्रिया काल-आजची नव्हे. लोकपरंपरेचा हात धरून चाललेल्या इथल्या संतपरंपरेच्या प्रभावानंतर गेल्या ५-६ शतकांमध्ये हळूहळू इथल्या लोकपरंपरेला पर्यायी अशी एक बुद्धिजीवी परंपरा बळकट होत गेली. ब्रिटिश राजवटीत नव्या ज्ञान-विज्ञानाशी परिचयाची संधी मिळालेल्या अभिजनांनी ती अधिक बळकट केली. या परंपरेनं बहुजन समाजाशी आणि लोक परंपरेशी असलेली आपली नाळ तोडली आणि चित्र, संगीत, नाटक इ. कलांच्या स्वतंत्र व्यवस्था निर्माण झाल्या. व्यक्तिवादाचा उदय झाला आणि क्रमानं आत्यंतिक व्यक्तिवादाकडं सरकणाऱ्या नव्या अभिजनपरंपरेनं समूहाशी असलेलं जैविक नातंच संपुष्टात आणलं.

लोकपरंपरेत व्यक्तिविशिष्टता नाही. आपापल्या व्यक्तिगत वैशिष्ट्यांसकट निर्मितीत सहभागी होत समूहजीवन घडवणं, सुंदर करणं, अर्थपूर्ण करणं ही लोकसंस्कृतीत सहज, स्वाभाविक घडणारी प्रक्रिया असते. किंबहुना तिथे जे जे घडतं ते कुणा एका व्यक्तीचं नसतंच, म्हणून तर तिथल्या निर्मितीवर कुणा एकाचं नाव नसतं, कुणा एकाची मुद्रा नसते.

पीटर ब्रुकच्या आत्मचरित्रात त्यानं लिहिलेला एक बोलका अनुभव मला आठवतो आहे. महाभारतासारखं महाकाव्य हेही मुळात एकप्रकारे लोककाव्यच म्हणायला हवं. भारताचार्य चिंतामणराव वैद्य म्हणतात तसा तो त्या काळात झालेला एक बृहत्कथासंग्रहच आहे.

पीटर ब्रुकसारख्या आधुनिक नाट्यधर्मी प्रतिभावंतांनं जागतिक पातळीवर ही कथा मांडली. जगभरच्या कलाकारांना घेऊन त्यानं सहा तासांचा दीर्घ नाट्यप्रयोग प्राकृतिक नेपथ्य वापरून उभा केला. त्याच्या आत्मचरित्रात त्यानं नाट्यनिर्मितीपूर्वी संशोधनासाठी भारतात फिरत असतानाचे अनुभव सांगितले आहेत. त्यांपैकीच एक हा दक्षिणेतला अनुभव.

एका जमातीतला एक माणूस त्याला आणि त्याच्या सगळ्या सहकाऱ्यांना त्यांच्या महाभारतातली (लोकमहाभारतातली) एक कथा ऐकवत होता. गोल रिंगण करून सगळे बसलेले. स्थानिक लोकही त्यात होतेच. ती कथा ऐकणं हा एक थरारून टाकणारा अनुभव होता आणि तितकीच थरारून टाकणारी होती कथेच्या अखेरची त्या कथाकथकाची कृती.

ती गोष्ट सांगणाऱ्यानं गोष्ट सांगून संपवली आणि नंतर तो श्रोत्यांनी केलेल्या रिंगणाच्या मध्यभागी आला. त्यानं वाकून जमिनीवर हात ठेवला आणि तो म्हणाला, 'आत्ता मी सांगितलेली ही कथा आता मी इथे ठेवतो. आता ही सगळ्यांची झाली'. लोकसंस्कृतीतलं हे जे 'सगळ्यांचं होणं' आहे ते नागर संस्कृतीत नाहीसंच झालं आहे. समूहस्वर लावण्याची कलांची ताकद अभिजनांमधून क्रमानं उणावत गेली आहे. त्याचं एक कारण म्हणजे जगण्याशी असलेला कलांचा संबंध तुटत गेला आहे. लोकसंस्कृतीचं एक व्यवच्छेदक लक्षण हे होतं की, कला- सगळ्याच कला या जगण्यातच अंतर्भूत होत्या, जगण्याचा स्वाभाविक भाग होत्या. त्यामुळे जगण्याशी त्यांची सेंद्रिय एकात्मताच होती. विज्ञानाच्या वाढीबरोबर जगण्याचे तुकडे करून आपण सूक्ष्मतेकडे जाऊ लागलो खरे आणि लहान-लहान तुकड्यांच्या ज्ञानाचं मोठ्या प्रमाणावर विशेषीकरणही (स्पेशलायजेशन) करू लागलो खरे; पण त्यातून समग्रतेनं जगणं आणि समग्रतेनं समजून घेणंच संपत चाललं.

शिवाय यामुळं आपलं जगणं इतकं स्वतःपुरतं होत गेलं की, इतरांच्या जगण्याशी आपलं काही देणंघेणंच उरलं

नाही. माणसाच्या जातीला सृष्टीतल्या मानवेतरांच्या जगण्याचा विचार करण्याची गरजच वाटेनाशी झाली. त्यामुळे माणसाचे बृहत्तर जीवनाचे संदर्भ आटत गेले. मानवी जीवनाखेरीजचं जीवन हा आपल्या आस्थेचा, कुतूहलाचा विषय राहिला नाही. प्रदूषणाचे भयंकर प्रश्न त्यातूनच निर्माण होत गेले, हे आज जाणती माणसे समजू शकतील. सृष्टी-प्राण्यापाखरांसकटची, किडामुंग्यांसकटची सृष्टी, कल्पनेचं जग, निसर्गाची गूढं, अतिभौतिकाचं जग, स्वप्नं, कोडी, अद्भुतरम्यता-लोकसंस्कृती या सगळ्यांसकटची संस्कृती होती आणि त्यातही स्त्रिया निर्मितीच्या अंगानं जगण्याच्या जास्त जवळ होत्या.

निर्माण करणं हे बाईच्या आतच स्वाभाविकपणे आहे म्हणून की काय लोकसंस्कृतीकडे पाहिलं, तर बायकांच्या सर्व कला जगण्यातून उगवलेल्या, जगण्याला सजवणाऱ्या आणि जगण्याचा अनुवाद करणाऱ्या आहेत. भिंती, जमीन, चुली, अंगण सारवणं असो, त्यावर चित्र रेखाटणं असो, भरतकाम-विणकाम करणं असो, वस्त्र विणणं असो, स्वयंपाकाचे तऱ्हेतऱ्हेचे पदार्थ करणं असो, टोपल्या आणि इरली बनवणे असो- या सगळ्या कला बाईच्या जगण्याचा एक भाग होता. तिनं रंगवलेली चित्रं म्हणजे भिंतीवर तिनं केलेली जगण्याची पुनर्रचनाच होती. तिनं दळताकांडताना गायलेली गाणी म्हणजे तिच्या आंतरिक जगण्याचा पुनरुच्चारच होता.

चीनमध्ये म्हणे काहीशे वर्षांपूर्वी जेव्हा बायका सर्व प्रकारच्या बंधनातच जगत होत्या तेव्हा त्यांनी खास त्यांची (बायकांची) अशी एक चित्रभाषा तयार केली होती. 'नान शू' या नावाची भाषा. सणा समारंभांना, विशिष्ट प्रसंगांना, भांड्यांवर, कपड्यांवर स्त्रिया जी चित्रं काढत, जी सजावट करत, जी नक्षी रंगवत त्यात या भाषेतून त्या एकमेकींशी बोलत, निरोप पाठवत, संवाद करत. हा दृक्-संवाद त्यांच्यासाठी जगण्याच्या मोलाचा होता. दुर्गाबाईंनी काही आदिवासी जमातींमधल्या बायकांच्या चित्रांतले संकेत सांगितले आहेत.

एखादीला बाळ होणार असेल, तर प्रसूतीपूर्वी तिच्या खोलीत काढण्याच्या विशिष्ट आकृती असत. त्या आकृतींमधून बायका तिला सांगत की, 'या जगात तू जे मूल आणणार आहेस ते किती गुंतागुंतीच्या आणि अवघड वाटा पार करून येणार आहे' आणि बाळ झाल्यावर त्या पुन्हा नव्या आकृत्या काढत. त्यांतून त्या बाळाला सांगत की, 'तुला या जगातून आता पार होणं किती अवघड आहे'.

एकूणच चित्रांमधून, गाण्यांमधून, नृत्यांमधून समृद्ध जीवनाशय निर्माण करण्याची ताकद त्यांच्यात सहजात होती. या बायकांनी सहज साधं रोजचं काम करताना कलेच्या मूलभूत सौंदर्यतत्त्वांचे हात किती गोडव्यानं धरले होते! यांच्या अंगभूत लयी, यांच्या देहाची वळणं, यांच्या भाषेचे हेल-बायकांनी दृक्-श्राव्य सौंदर्याचं एक रसरसतं जगच निर्माण केलं. खरं तर बायकांचं रूपाचं भान, लय, ताल आणि गतीचं भान, यांचं नादाचं भान आणि अर्थाच्या नाजूक वळणांचं भान खरोखर आश्चर्य वाटावं इतकं सुंदर आहे.

लोकपरंपरेतलं जवळजवळ ७०% मौखिक वाङ्मय हे स्त्रियांनी निर्माण केलेलं आहे. त्यात ओव्या आहेत, गाणी आहेत- फेराची आहेत, खेळांची आहे, श्रमांची आहेत, देवदेवतांची आहेत. शिवाय कहाण्या आहेत, कथा आहेत. कितीतरी प्रकार आहेत. अनेक शतकं दडपलेल्या, दुःख भोगणाऱ्या, श्रमणाऱ्या अशा बायकांनी लोकपरंपरेच्या मुठीत जे जे सारलं आहे ते मी तर म्हणेन भारतीय स्त्रीच्या जीवनसत्त्वाचं माणिक आहे.

बाईच्या कलांमधून तिचं जगण्याविषयीचं शहाणपणही व्यक्त झालं आहे. तिच्या ओव्याच पाहा ना! सूक्ष्म निरीक्षण आहे, परिस्थितीचं नेमकं आकलन आहे, सुखदुःख आहे आणि तिचं म्हणून एक तत्त्वज्ञानही आहे.

*लेकी नेल्या चोरीं, लेक नेले घारीं ।*
*परदेशी म्हातारी, घरामध्ये ।।*

असं म्हातारपणाचं सार्वकालिक सत्य सांगणारी एखादी ओवी असो,

*सासुरवाशिणी लेकी निघाल्या उन्हाच्या ।*
*आई बापामागं भाऊभावजया कुणाच्या ।।*
*असा विदीर्ण करणारा अनुभव असो, किंवा*
*सांडली साखर, मुंग्या जातात घेऊनी ।*
*सुखाला सर्वेजण, दुःखाला नाही कोणी ।।*

अशी शहाणी समजूत असो.

बाईजवळ आयुष्याच्या स्वीकाराची एक जबरदस्त ताकद आहे. तिचा गोतावळा, त्याच्याशी असलेले तिचे भावबंध, तिचं घर, परिसर, तिचे विचार, तिच्या भावना- एकूण तिच्या जगण्याचं दस्तावेजीकरण म्हणजे तिच्या गोष्टी, तिची गाणी, तिची ओवी, तिच्या म्हणी आणि वाक्प्रचारही. सबंध मध्ययुगीन वाङ्मय एका बाजूला संपन्न अशा भक्तिसाहित्यानं भरलेलं आहे आणि दुसऱ्या बाजूला स्त्रियांच्या समृद्ध अशा मौखिक निर्मितीनं भारलेलं आहे. या

स्त्रियांजवळं जगण्याला तोंड देण्याची जी धिटाई आहे, जो आत्मविश्वास आहे किंवा जी चतुराई आहे त्यानं आपण अक्षरशः अवाक् होतो, इतकं ते जोरकस आणि सच्चं जीवनदर्शन आहे.

आज दुर्दैवानं आपण मौखिक वाङ्मयाच्या परंपरेपासून दुरावलो आणि किती मोठ्या जगण्याला वळ देणाऱ्या गोष्टींना वंचित झालो हे आपल्या लक्षातही येत नाही. वस्तुतः उच्चारित शब्दांची परंपरा ही भारतीयांची एक दीर्घजीवी, मुख्य आणि प्रभावी अशीच साहित्य परंपरा! ४० लाख वर्षांची परंपरा! उच्चारित शब्दांना समूहाची पार्श्वभूमी असते. एकमेकांमध्ये संवादाचं, विश्वासाचं एक सूत्र असतं.

लिखित परंपरेतला लेखक एकाकी असतो आणि वाचकही एकाकी असतो. मौखिक परंपरेचं असं नाही. हृदयसंवादाचा त्या परंपरेतला प्रभाव साक्षात असतो. अनक्षरत्व किंवा निरीक्षरत्व म्हणजे अज्ञान नव्हे. उलट स्मरणशक्तीचं महत्त्व संपुष्टात आणणारी लिखित शब्दांची दुनिया माणसाचे ऐंद्रिय संवेदनांच्या द्वारा ज्ञान प्राप्त करण्याचे मार्गच विनमहत्त्वाचे ठरवत चालली आहे.

आपल्या रोजच्या जीवनाचा विचार केला तरी पाहा ना, पाठांतरे संपली. पाढे संपले, तोंडी हिशेब गेले, कथागीतं हरवली, मनी-मुखी रेंगाळतील अशा कविता हरवल्या, माणसांना गोष्टी सांगता येईनाशा झाल्या, शब्दांशी जोडलेलं ठेक्यांचं, नादांचं, गतीचं, भाषेच्या डौलांचं जे भान, ते भानच नाहीसं झालं. शब्द फक्त अर्थाशी जोडलेला राहिला.

असं होता कामा नये, असं वाटणारी जागरूक माणसंही दिसेनाशी झाली. इरावतीबाई कर्वे मुक्ताबाई दीक्षितांना म्हणायच्या, 'मुक्ताबाई, तुमचं हे बोलणं आहे ना, ते सांभाळून ठेवलं पाहिजे. ते फार मोलाचं आहे हो!' बायकी भाषा म्हणून जिला हिणवलं गेलं त्या भाषेनं आपल्याला, आपल्या प्रमाण भाषेला केवढी लवचीकता, ताकद आणि केवढा रसाळपणा दिला आहे याचा थोडा विचार तरी करून पाहा! भ्रष्टतेपासून दूर ठेवत भाषेला जिवंत ठेवलं ते चार भिंतींमधल्या बायकांनी. म्हणून तर आदिवासी भाषा आणि बोलीचे अभ्यासक असं आवर्जून नोंदवतात की, या बोली अधिक शुद्ध स्वरूपात सापडतात त्या बायकांच्या तोंडी.

एकीकडे साक्षरतेचे प्रमाण वाढत असताना वास्तविक आजही देशात निरक्षरांची संख्या फार मोठी आहे आणि त्यांना शिकवला जाणारा शब्द आता सांस्कृतिक संदर्भ छाटलेला, वैविध्याला अवसर नसलेला आणि वाढीच्या जुळणी आरंभिली आहे.








अनुक्रमणिका

जीवशास्त्रीय प्रक्रियेपासून तुटलेला शब्द आहे आणि छोट्या-छोट्या लोकसमूहांच्या बोलींचं भवितव्य काय हा प्रश्न अधिक गंभीर झाला आहे. कलांच्या नागरीकरणाचे प्रश्न जसे गुंतागुंतीचे आहेत तसेच भाषांच्या प्रमाणीकरणाचे प्रश्नही गुंतागुंतीचेच आहेत आणि माणसाच्या जगण्याशी असलेला त्यांचा बंध मध्यवर्ती ठेवूनच त्या गुंत्याचा विचार करण्याची आणि सोडवणुकीचे मार्ग शोधण्याची गरज आहे.

भाषिक प्रश्नाइतकाच महत्त्वाचा आणखी एक प्रश्न समकालीनतेचा आहे. केवळ स्त्रियांच्या संदर्भात विचार केला तरी आजवर स्त्रियांचं म्हणून जे वाङ्मय होतं - ज्याला कमलाबाई देशपांडे (साहित्यसम्राट न. चिं. केळकरांची कन्या आणि साताराच्या कन्या शाळेच्या मुख्याध्यापिका) या अपौरुषेय वाङ्मय म्हणाल्या होत्या, ते आपापल्या काळातल्या स्त्री-जीवनाचं प्रतिबिंब धरणारं वाङ्मय होतं. ते कधी आपल्या काळातल्या जीवनधारणांशी संवादी होतं, कधी त्याचा शांत स्वीकार करणारं होतं. कधी अमान्य गोष्टींविषयीचा राग व्यक्त करणारं होतं आणि कधी परखड, थेट, वंडखोरही होतं.

उदा. मुलीचा जन्म! मुलगी जन्माला येणं ही या देशात मध्ययुगापासूनच सर्वसाधारण माणसांसाठी बहुतेक वेळा दुःखाची आणि नकोशी गोष्ट होती. गर्भलिंगनिदानाच्या अत्याधुनिक सोयी नसलेल्या त्या काळात काही समाजांत मुलगी जन्माला आली, तर तिच्या तोंडाला गूळ चिटकवायचा, कानात कापसाचे बोळे घालायचे आणि तिला मारून टाकायचं म्हणायचं,

गुड खाईये । पुनी कातिये । अब न आईये । भाईयों धत्तिये ।

- गूळ खा. कापूस कात. आता गेलीस, की परत येऊ नकोस. तुझ्या भावांना मात्र धाडून दे.

प्रख्यात हिंदी साहित्यकार महादेवी वर्मांच्या घरी म्हणे मुलगी जन्मली, तर तिला दूधपीती करण्याचा पूर्वापार रिवाज़ होता. म्हणजे मुलगी जन्मली, की बाळंतिणीच्या खोलीतून निरोप जायचा 'लंक्ष्मी है।' आणि ते ऐकून कुटुंबप्रमुख म्हणायचा, 'विदा कर दो।' मग दुधानं भरलेल्या भांड्यात त्या मुलीला बुडवून मारलं जाई.

महादेवींचा जन्म झाला तेव्हा कसं कोण जाणे त्यांच्या आजोबांना वाटलं की, एकदा तरी या घराला कन्यादानाचं पुण्य मिळावं. म्हणून मग महादेवींना जगू द्यायचं ठरलं आणि दोनशे वर्षांनंतर त्या घरात मुलगी वाढली, मोठी झाली आणि कर्तृत्वानं तिनं भारतीय साहित्यात मानाचं स्थान मिळवलं.

बाई मूल जन्माला घालते तेव्हा ती फक्त आई असते. जन्मणारा जीव मुलगा आहे की मुलगी याचा विचार ती करत नसते. एके काळी मुलगी नको, असं ती म्हणतं असेल तर फक्त कुटुंबाच्या किंवा समाजाच्या दडपणामुळं किंवा बाईच्या जन्माला येणं म्हणजे फक्त कष्ट आणि दुःख असा तिचा अनुभव असल्यामुळं.

संसारात पुरुषाकडून हवी असणारी समजूत आणि मनाची जपणूक ही केवळ आधुनिक स्त्रीचीच अपेक्षा नाही.

*मपल्या मनाजोगं मन लाभलं दैवानं ।*
*कंथाच्या जीवावर रोज सोसते मरण ।।*

असा एखादीचा अनुभव जुन्या काळातही व्यक्त होतो.

आणि

*काम म्हणून काम, मला कामाचं भ्याव नाही ।*
*घडीच्या इसाव्याला, माझ्या जीवाला कोणी नाही ।।*

असा भरल्या घरातल्या एकाकीपणाचाही अनुभव असतो.

बाईच्या देहाशी तिला घट्ट जखडून टाकणाऱ्या व्यवस्थेला तिचं तरल मन कळत नाही आणि तिच्या देहाचा ताबाही उपभोगासाठी पुरुष स्वतःकडेच घेत राहतो. लोकपरंपरेचा हात धरणाऱ्या संत स्त्रियांनी या वस्तुस्थितीचा अतिशय स्पष्ट आणि धीट उच्चार केलेला आहे. ज्याला आपण कौटुंबिक बलात्कार म्हणू त्याचा उच्चार एखाद्या वहिणाबाईच्या अभंग रचनेत आपल्याला दिसतो. तेव्हा आपण थक्क होतो आणि लोकपरंपरेतील एखादी धीट देवदासी संक्रवा आपल्या शेजेवर येणाऱ्या देवालाही जेव्हा दुराचारी म्हणून स्पष्ट हिणवते तेव्हाही आपण अवाक् होतो.

दुर्गाबाई भागवतांनी बाईचा मृत्यूनंतरही अपमान करणारी एक प्रथा नोंदवली आहे. कोकणातल्या कुठल्याशा जमातीत मेल्यानंतर म्हणे फक्त सधवेलाच लुगडं नेसवून स्मशानात नेत असत आणि बाकीच्या बायकांना तसंच नेत असत, या प्रथेचा उल्लेख करून, दहाव्या वर्षी वैधव्य आलेल्या आणि बापाच्याच अत्याचाराचा बळी ठरलेल्या एका स्वयंपाकीणबाईची इच्छा सांगताना दुर्गाबाईंनी लिहिलं आहे की, बाई म्हणाल्या, 'मी गेल्यावर स्मशानात नेताना कमरेखाली तरी निदान शेण थाप गं!' आणि दुर्गाबाईंच्या आजीचे उद्‌गार असे होते, 'भलेपणी तीन चिमट्या राख झाली की बाईनं जिंकलं. तोवर नाही'. तोवर देह आहे. मेलेलीलासुद्धा देह आहे. तोवर विटंबना केव्हा होईल काही नेम नाही. आज सतत घडत असलेल्या वेगवेगळ्या वयाच्या

स्त्रियांच्या विटंबनेच्या, विनयभंगाच्या, वलात्काराच्या घटना वाचत असताना बायकांनी रुढी-प्रथांमध्ये अनुभवलेलं हे दाहक वास्तव नव्यानं धगधगून उठतं, असं वाटतंय.

प्रश्न तसेच आहेत. स्त्रीचा विचार फक्त देहापुरता करण्याचे, तिला उपभोगासाठी वापरण्याचे आणि पुरुषसत्ताक समाजात तिच्या वाट्याला कायम भीती आणि असुरक्षितता ठेवण्याचे. त्यावरही उपाय आहेत. बाईनं स्वत:पुरते शोधलेले. स्वत:ला ओळखण्याचे, स्वत:चं बळ वाढवण्याचे, दुबळेपणा दूर ठेवण्याचे.

तिखट आम्ही लेकी, जशी तेज तलवार ।
खाली पाह्य पाप्या, ठेव नजर भुईवर ।।

असं धीटपणे पुरुषाला वजावणाऱ्या आणि आधाराचे हात सुटले तरी ज्योतिषाचा किंवा मांत्रिकाचा आश्रय नाकारून 'आता माझा मले जीव' असं म्हणणाऱ्या बायकांनी लोकपरंपरेतला स्त्रीशक्तीचा अंत:स्वर उंच आणि जिवंत ठेवला आहे.

कष्ट करणारी, मेहनतीचा कंटाळा नसलेली, कुटुंबावर प्रेम करणारी, जगाच्या व्यवहाराकडे चांगली सजगपणे पाहणारी, असह्य दु:खांना लहान वाळांसारखी स्वीकारणारी आणि चिवटपणे आयुष्याला तोंड देत आपल्या मुलांबाळांसकट संसाराची नाव पैलथडी लावणारी एक शहाणी, जिद्दी, लढाऊ आणि कणखर अशी स्त्री लोकपरंपरेत दिसते.

सध्या निरनिराळ्या मालिकांमधून दिसणाऱ्या वहुतेक सगळ्या नटव्या, मूर्ख, दुवळ्या किंवा क्रूर आणि हिंसक स्त्रियांना मार्गावर आणण्यासाठी आणि उथळ मनोरंजनाच्या हौसेमधून त्या मालिकांमध्ये गुंतलेल्या प्रेक्षकांना बाहेर काढण्यासाठी लोकपरंपरेतल्या या शहाण्या आणि ताठ कण्याच्या बायकाच पुढे आल्या पाहिजेत, असे वाटते.

शेवटी माणदेशातल्या एका कर्तबगार आणि सेवाभावी अशा एका कार्यकर्त्या बाईचा अनुभव सांगून मी थांबणार आहे. चेतना सिन्हा हे नाव मला वाटतं आपल्यापैकी निदान काही जणांना परिचित असेल. माणदेशाचा विकास घडवण्यासाठी ग्रामीण महिलांच्या संघटनेचा आणि सवलीकरणाचा यशस्वी प्रयत्न करणाऱ्या चेतना सिन्हा. त्यांनी म्हसवडला महिला ग्रामीण वँक सुरू केली आहे, महिला बिझनेस स्कूल चालवलं आहे. ग्राम विकासाच्या अनेक कल्पना तिथे प्रत्यक्षात आणल्या आहेत. आर्थिक







अनुक्रमणिका

स्थैर्याबरोबरच बायकांना एकमेकींच्या साथीनं प्रगतीच्या वाटेवर चालण्याच्या आनंदाची ओळख करून दिली आहे.

एकदा स्वत:बद्दल बोलताना एका जाहीर समारंभात त्या म्हणाल्या होत्या, 'मी मूळची मुंबईची. संघर्षवाहिनीत काम करणारी. माझ्या कार्यकर्त्या मित्रानं-विजयनं मला लग्नाबद्दल विचारलं. विजय मूळचा माणदेशातला. त्याला मी म्हटलं की, माझ्या काही अटी आहेत. खरं तर एक मोठी यादीच होती माझ्या अटींची. मी म्हटलं होतं की, मी जशी आहे तशीच तुझ्या गावात येईन. मी जीन्स घालणं सोडणार नाही. कापलेले केस वाढवणार नाही. इ. इ.'

'विजयनं सगळं मान्य केलं आणि लग्नानंतर मुंबईला राहणारी उच्चशिक्षित, आधुनिक, स्वतंत्र स्त्री-चेतना विजयच्या गावात राहायला आली; पण मी पाहिलं की, घरात माझी सासू होती. नवऱ्यामागे आपल्या मुलांना मोठं करून, घरचा व्यवसाय, शेती सांभाळून त्या एवढ्याशा गावात माझी तरुण विधवा सासू वेगवेगळ्या अडचणींना तोंड देत जगण्यात पाय रोवून खंबीरपणानं उभी राहिली. तिचं धाडस आणि तिची कर्तबगारी काही महिन्यांतच मला कळली आणि स्वतंत्र, समर्थ स्त्रीची माझी कल्पना कशी अपुरी होती आणि केस कापण्याच्या, जीन्स घालण्याच्या माझ्या आधुनिकतेच्या अटी किती निरर्थक होत्या हे मला कळून चुकलं.'

अभिजात परंपरेचं आणि लोकपरंपरेचं नातं मला चेतना सिन्हा आणि तिच्या सासूबाईसारखं वाटतं. या व्यासपीठावर एवढंच सांगितलं तरी पुरे.

खरंतर अभ्यासकांनी केलेलं काम बाजूला ठेवून पाहू या. मग लक्षात येतं की, स्त्रीरचित सगळ्या लोकवाङ्मयाकडे नागर साहित्यदृष्टीने थोड्या उपेक्षेनंच पाहिलं आहे. कसलंही कृत्रिम अलंकरण नसलेल्या, साध्या आणि उत्स्फूर्त अशा तिच्या ओव्या, तिच्या कहाण्या, तिच्या गोष्टी संवेदनांचा ताजेपणा म्हणजे काय हे सांगणाऱ्या. लयीनं भारलेल्या, नादपूरकांनी भरलेल्या. व्यक्तिगताची आच लागून लाहीसारखं फुटलेल्या तिच्या आयुष्याचं तत्त्वज्ञान त्यात सापडतं. भाषेचं एखाद्या रानफुलासारखं सौंदर्य जाणवतं.

आणि केवळ साहित्य म्हणून नव्हे, तर मध्ययुगीन स्त्रीजीवनाचा दस्तावेज म्हणूनही नव्या अभ्यासकांना ते महत्त्वाचं वाटतं. आपल्याकडे एकूणच पारंपरिक संचिताकडे पाहण्याची अभिज्ञता पुरेशी नाही आणि सांस्कृतिक अभिज्ञताही पुरेशी नाही. शतकांच्या अनुभवांमधून आलेलं जगण्याविषयीचं ज्ञान नव्या बाजारपेठीय दडपणाखालच्या जगानं झटकून टाकलं आहे आणि नव्या जगण्यासाठी उपयोगी अशी कसदार विज्ञाननिष्ठाही आपल्याकडे नाही. त्यामुळे लोकसंस्कृतीकडे पाहण्याचा निरोगी, अध्ययनशील दृष्टिकोन इथे तयार झालेलाच नाही.

लोकधर्मी अध्ययनाची कक्षा व्यापक करणारे आणि त्यासंबंधी शेकडो साधनं उजेडात आणणारे इतिहासाचार्य राजवाडे, संकलन आणि आस्वाद यांच्या पलिकडे जाऊन लोकसाहित्याच्या शास्त्रीय अभ्यासाची पायाभरणी करणाऱ्या दुर्गाबाई भागवत, अनेक ज्ञानशाखांचा समन्वय करीत लोकसाहित्याचा बहुमुखी अभ्यास करताना संस्कृतीचा सर्जक पुनर्विचार करणारे रा. चिं. ढेरे किंवा समाजशास्त्राच्या अध्ययनाला लोकसंस्कृतीचं व्यापक क्षेत्र खुलं करून देत लोकसाहित्याच्या अभ्यासाचा क्षेत्रविस्तार करणारे प्रभाकर मांडे यांच्या जोडीला सीमा प्रदेशातल्या लोकसाहित्याची दखल घेणारे आणि लहान लहान लोकसमूहांचं मौखिक साहित्य समोर आणणारे इतर अभ्यासक लक्षात घेतले, मधुकर वाकोडे, तारा भवाळकरांसारख्या ज्येष्ठ अभ्यासकांच्या जोडीला प्रत्यक्ष लोकवाङ्मयाच्या क्षेत्रात नसणारे; पण आपापल्या कामांमधून अप्रत्यक्षपणे त्या अभ्यासाला साहाय्यभूत होणारे महाराष्ट्र-गोमंतकातले लेखक धांडोळले, तर सहज समजून येणारी एक महत्त्वाची गोष्ट अशी, की भाषावार प्रांतरचनेला ओलांडून देशाचा एक वेगळा सांस्कृतिक भूगोल यांनी नजरेसमोर आणला आहे.

आज देशभर विविध संशोधनसंस्था लोकसाहित्याच्या आणि लोककलांच्या संकलन-जतन-अभ्यासाच्या कामात कार्यरत आहेत. महाराष्ट्रात मात्र आपलं समृद्ध लोकसंचित अभ्यासणारी आणि एकात्मतेची देशव्यापी अशी आंतरवीज उलगडणारी एकही सक्षम संस्था अस्तित्वात नाही. (विद्यापीठीय पातळीवरचा एखादा अपवाद अपुराच आहे.) राजकीय पातळीवर छिन्नभिन्न झालेल्या मध्ययुगीन महाराष्ट्राची सांस्कृतिक एकसंधता मौखिक परंपरेनं टिकवली आणि संतपरंपरेनं तिचाच हात धरून समाजाची आंतरिक शक्तिमत्ता चेतवली. लोकपरंपरांच्या पश्चिमी अभ्यासात संरचनेच्या सूक्ष्मतेला महत्त्व आहे; पण आपल्याकडे भारतीय अभ्यासदृष्टी या परंपरांच्या जीवनसंबद्धतेला महत्त्व देणारी आहे. या पार्श्वभूमीवर होणारं हे संमेलन म्हणूनच मला महत्त्वाचं वाटतं आहे.

●



लेख

डॉ. नवनाथ तुपे

# वाचन चिकित्सा

वाचनप्रक्रियेची चिकित्सक मांडणी करणारा आणि मूलतत्त्वे उलगडून दाखवणारा डॉ. नवनाथ तुपे यांचा लेख.

वाचा ही मानवी व्यक्तिमत्त्वाची खास वैशिष्ट्यपूर्ण ओळख आहे. 'व्यक्तिमत्त्व-उपपत्ती' सिद्धान्तासंबंधी आपला दृष्टिकोन मांडताना स्टेर्न यांनी वाचेची तीन उगमस्थाने सांगितली आहेत. त्यांच्या मते, 'अभिव्यक्ती प्रवृत्ती' (Expressive Tendency), संवादाची 'सामाजिक प्रवृत्ती' (Social Tendency) आणि 'हेतू प्रवृत्ती' (Intentional Tendency) ही वाचेची आद्यतत्त्व आहेत.[१] यांपैकी पहिल्या दोन प्रवृत्ती सर्व प्राण्यांच्यात आढळतात; मात्र तिसरी प्रवृत्ती ही केवळ मनुष्यात दिसून येते. मानवी वाचेचे हे एकमेवाद्वितीय गुणवैशिष्ट्य आहे. 'हेतू' तत्त्वच मानवी वाचेतील संवेदना अथवा अर्थ सूचित करतात. मानवाने त्याच्या मानसिक विकासाच्या विशिष्ट टप्प्यावर मनात निर्माण होणाऱ्या हेतूला व्यक्त करण्यासाठी विशिष्ट ध्वनी निर्माण करण्याची शक्ती अवगत केली. अशा ह्या हेतुयुक्त कृतीच पुढे विचारकृती ठरल्या. आज अक्षर संकेतांनी वाचा विकासाची प्रक्रिया ही अंतर्बाह्य बदलून टाकली आहे. माणसाला प्रथम विचार सुचतात नंतर ते व्यक्त करण्याची भाषा निर्माण होते. अशाप्रकारे मानवाची वाचाशक्ती विकसित होत गेली. ह्याच प्रवृतीमुळे मनुष्याला अध्ययनाची क्षमता प्राप्त झाली. एरिक फ्रोम नमूद करतात की, मनुष्य हा इतर प्राण्यांसारखा निसर्गात सहजप्रवृत्तीच्या जोरावर नव्हे तर अध्ययनाच्या साहाय्याने समायोजन करतो.[२] केवळ मानवातच सिद्धांत, कल्पना, तत्त्वे जाणून घेण्याची आणि त्यांचा व्यवहारात अवलंब करण्याची क्षमता आहे. मनुष्य सभोवतालच्या वास्तवावर विमर्श चिंतनातून कृती करतो आणि या क्रिया-प्रक्रियेतून वास्तवात परिवर्तन घडवतो. परिवर्तनाचा हाच अनुभव त्याच्या ज्ञानाचा स्रोत बनतो[३]. ही शक्ती फक्त मनुष्याला लाभली आहे. त्यालाच स्वीकार्य रीतीरिवाज अथवा दृष्टिकोन (praxis) म्हणतात. मात्र हजारो वर्षांच्या संस्कृतीकरणातून हे दृष्टिकोन घडत असतात. शिक्षणातून मात्र व्यक्तीच्या दृष्टीत सातत्याने बदल होतात. सर्व प्रकारचे अध्ययन साहित्य हे व्यक्तीच्या दृष्टिकोनात अथवा हेतूंत बदल घडविण्याचे महत्त्वाचे कार्य करीत असते. व्यक्ती अनेक माध्यमांतून शिकत असली तरी तिचे सर्वाधिक शिक्षण हे वाचनातूनच घडते. म्हणून वाचन हा शिक्षणाचा कणा आहे. प्रस्तुत लेखात हेतूंचे अर्थातच विचारांचे विविध पदर जाणून घेण्यासाठी चिकित्सक वाचनाचे प्रारूप स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे.

**वाचन अध्ययन-अध्यापन :**

वाचन हे एक कौशल्य आहे. त्यात अनेक उपकौशल्यांचा समावेश आहेत.





अनुक्रमणिका

वाचन म्हणजे लिहिलेल्या अथवा छापलेल्या अक्षर संकेतांना अर्थ लावण्याची प्रक्रिया आहे; परंतु केवळ अक्षर संकेतांना अर्थ लावणे म्हणजे परिपूर्ण वाचन नाही. लिहिलेल्या अथवा छापलेल्या मजकुराला समजून घेणे, त्यातील शब्दांचे अर्थबोध अवगत करणे, त्याला सर्वकष अर्थ लावणे व त्या अनुषंगाने प्रतिकात्मक भावना प्रकटने, संकल्पना आत्मसात करणे, अनुभव वेचणे इत्यादींसह वाचन ही विचारप्रवण करणारी प्रक्रिया आहे.

संकेतीकरण व अर्थग्रहण प्रक्रियेत नेत्र,बुद्धी, मन, संवेदना इत्यादींचा पूर्णपणे सहभाग असतो. ग्रे यांच्या मते, वाचन हे अर्थपूर्ण असते. त्यांनी अर्थाचे एकूण तीन स्तर पाडले. पहिला स्तर शाब्दिक अर्थ आहे, जो शब्दशः घेतला जातो. अभिप्रायात्मक अर्थ हा उपयोजनात्मक पातळीवर घेतला जातो आणि तिसरा स्तर म्हणजे मूल्यमापनात्मक स्तरावरील अर्थ जो वाचकाने साहित्य वस्तूला स्वतःच्या भाषेत दिलेला प्रतिसाद असतो. रॉबिन्सन यांनीसुद्धा अर्थबोध प्रतिमान विकसित केले. त्या प्रतिमानात त्यांनी वाचनाचे चार स्तर सांगितले आहेत. (१) शब्दबोध ज्यात शब्दांची ओळख व त्याचा अर्थ (२) आशयग्रहण ज्यात शब्दशः अर्थ व उपयोजनात्मक अर्थ. (३) प्रतिसादात्मक अर्थ ज्यात बौद्धिक निर्णय व भावनिक प्रतिसादांचा समावेश होतो, आणि (४) तादात्म्य ४. वाचनात तादात्म्य पावणे ही पुन:प्रत्यय देणारी प्रक्रिया आहे.

वाचन हे जसे वेगाने असले पाहिजे तसेच ते चिकित्सकही असले पाहिजे. आपण जितक्या वेगाने वाचन करू तितके अधिक अर्थग्रहण होते. संशोधनातून असे स्पष्ट झाले की, हळू वाचन करणारा वाचक शब्दशः वाचन करतो त्यामुळे मुख्य कल्पनाच वाचकाकडून सुटण्याची शक्यता असते. वेगवान वाचनात व्यक्तीची एकाग्रता वाढलेली असल्यामुळे उपयोजनात्मक आणि मूल्यमापनात्मक अर्थ प्राप्ती होण्याची शक्यता अधिक असते.

**“वाचन हे जसे वेगाने असले पाहिजे तसेच ते चिकित्सकही असले पाहिजे. आपण जितक्या वेगाने वाचन करू तितके अधिक अर्थग्रहण होते. संशोधनातून असे स्पष्ट झाले की, हळू वाचन करणारा वाचक शब्दशः वाचन करतो त्यामुळे मुख्य कल्पनाच वाचकाकडून सुटण्याची शक्यता असते. वेगवान वाचनात व्यक्तीची एकाग्रता वाढलेली असल्यामुळे उपयोजनात्मक आणि मूल्यमापनात्मक अर्थ प्राप्ती होण्याची शक्यता अधिक असते.”**

कोणतेही कौशल्य अवगत करण्याचे तीन टप्पे असतात. पहिला टप्पा हा कौशल्याविषयी तपशीलवार ज्ञान प्राप्त करण्याचा असतो. ते कौशल्यासंबंधीचे ते थेट ज्ञान असते. त्याला वस्तुनिष्ठ ज्ञान म्हणतात. चित्रवाचनाने वाचनाची सुरुवात केली, तर शब्दांचा बोध सहज होतो. वस्तू, स्थळ, व्यक्ती अथवा प्रक्रियांचे थेट ज्ञान अशा बोधातून प्राप्त केले जाते. घर बघ या वाक्यात 'घर' या शब्दाचा घराच्या चित्रातून थेट बोध होतो; म्हणून बोधात्मक स्तरावरील हे जे ज्ञान आहे ते थेट स्वरूपाचे आहे. दुसरा टप्पा हा कौशल्य वापरतांना ज्या अनेक प्रक्रिया घडतात त्या प्रक्रियांचे प्रक्रियात्मक ज्ञान अवगत करणे हा असतो. प्रक्रियात्मक ज्ञानप्राप्ती हे एक कौशल्य आहे. जसे वाक्य हे शब्दांपासून आणि शब्द हे अक्षरांपासून बनतात; व वाक्यांचा परिच्छेद आणि त्या परिच्छेदाचा सर्वकष अर्थ कसा लावला जातो, या विविध प्रक्रियांचे विश्लेषण केले, तर वाचन प्रक्रिया सहज स्पष्ट होते. तिसरा टप्पा आहे तो, कौशल्यांतर्गत घडणाऱ्या प्रक्रियांचा इतका सराव करायचा, की ती प्रक्रिया स्वयंचलित झाली पाहिजे. सरावामुळे प्रक्रियांचे अर्थपूर्ण सर्किट मेंदूत तयार झाल्यामुळेच ती प्रक्रिया स्वयंचलित बनते. मात्र आपल्या प्राथमिक शाळांमधून या तिन्ही प्रक्रियेतून वाचन कौशल्ये शिकविताना जो शास्त्रीय सराव करायला पाहिजे तो परिपूर्ण होत नाही. खरे तर इयता तिसरीपर्यंत प्रकट वाचन शिकविले पाहिजे आणि वयाच्या अठरा वर्षापर्यंत मूक वाचनाचे (silent Reading) प्रशिक्षण देण्याची सुविधा शाळां, महाविद्यालये आणि विद्यापीठांमध्ये असली पाहिजे. वाचन शिकविण्याची सुरुवात चित्र वाचन, वाक्य वाचन आणि शब्द वाचनाकडून अक्षरवाचनाकडे सरकली पाहिजे.

प्रस्तुत अभ्यासात, मामासाहेब मोहळ महाविद्यालय, पुणे, तेलंग महाविद्यालय, पिंपरी चिंचवड, क्रांतिसिंह नाना पाटील अकादमी, अमरावती इ. या तीन ठिकाणच्या कार्यशाळेत सहभागी झालेले पदव्युत्तर पदवीचे विद्यार्थी आणि बहुतांशी प्राध्यापक यांच्यासाठी चिकित्सक वाचन विषयावर एक सत्र आयोजित केले होते. त्यात वाचनाची चाचणी देण्यात आली होती. चाचणीचे हाती आलेली तथ्ये पुढील तक्ता क्र. १ मध्ये दिले आहेत.

**त.क्र.१३ पदव्युत्तरपदवीप्राप्त विद्यार्थी व प्राध्यापकांचा वाचन निर्देशांक व प्रतिमिनिट वाचन दर**

| वाचन दर | प्रतिसादक शिक्षक संख्या | श्रेणी | कमीत कमी | अधिकाधिक | मध्यमान | प्रमाण विचलन |
|---|---|---|---|---|---|---|
| प्रति मिनिट शब्द वाचन दर | ८० | १९७.३६ | ४८.६४ | २४६.०० | १३९.४४५५ | ३९.४७५२० |
| आकलनासह वाचन निर्देशांक | ८० | १३७.६३ | १७.३७ | १५५.०० | ७५.५७०१ | ३६.२८४५९ |

उच्च शिक्षण स्तरावरील विद्यार्थी व प्राध्यापकांचा वाचन वेगाचा दर सरासरी १३९ शब्द प्रतिमिनिट इतका आहे; तर आकलनासह वाचन निर्देशांक हा सरासरी ७६ आहे. या गटातील सर्वाधिक वेगाने वाचन करणारा एकमेव शिक्षक असून त्याचा वाचन वेग २४६ शब्द प्रतिमिनिट आहे, तर आकलनाचे प्रमाण विचारात घेतले ते १३८ पेक्षा जास्त नाही. या गटात केवळ ५% शिक्षकांचा वाचन वेग हा २०० शब्द प्रतिमिनिट आहे, तर सर्वाधिक वाचन निर्देशांक १५५ असणारे केवळ दोन शिक्षक दिसून आले आहेत. केवळ २८% शिक्षकांचा वाचन निर्देशांक १०० पेक्षा जास्त आहे. यावरून शिक्षकांचे आकलनासह वाचनाचे प्रमाण अत्यल्प दिसून येते. बहुतांशी शिक्षक व विद्यार्थ्यांना केवळ नजरेने वाचता येत नाही. त्यांच्या मूकवाचनात पुटपुटने, मान हलवणे, बोट ठेवून वाचने इत्यादी वाचन दोष दिसून येतात. यावरून उच्च शिक्षण स्तरावर वाचनाची समस्या आहे हे स्पष्ट होते. प्रथम या संस्थेने केलेल्या सर्वेक्षणानुसार,भारतातील इयत्ता ५ वी मध्ये शिकणाऱ्या केवळ ५०.३ % विद्यार्थ्यांना इयत्ता दुसरी स्तराचे साधे परिच्छेद वाचता येतात. अर्थातच ५०% विद्यार्थी शाळेत जाऊनही निरक्षर राहत आहेत[१]. ह्या परिस्थितीत सुधारणा होत असली तरी मंद गती आहे.

**जसा उद्देश तसे वाचन :**

जेव्हा नकाशात भारताची राजधानी शोधायची असते तेव्हा आपण सबंध नकाशा न वाचता थेट नकाशाच्या उत्तरेला राजधानीचा शोध घेतो. फोन निर्देशिकेत एखाद्या व्यक्तीचा फोन क्रमांक शोधायचा झाल्यास त्या व्यक्तीच्या आडनावाच्या आद्याक्षरापासून फोन क्रमांक शोधतो. आपण सबंध फोन निर्देशिका वाचत नाही. वाचनाचा जसा उद्देश असेल त्याप्रमाणे आपण वाचनाची पद्धती अवलंबितो. एखाद्या परिच्छेदातून तत्त्व, विचार अथवा कल्पनांचा बोध घ्यायचा असेल, तर त्या दिशेने आपले वाचन सुरू होते. संदेश प्राप्त करायचा असेल, तर काय आणि कशासंबंधी संदेश आहे, हे आपण पाहतो. तक्ता, आलेखातून माहिती घेताना आपली वाचनाची पद्धती सर्वेक्षणात्मक असते. एखाद्या आशयाचे रसग्रहण करायचे असेल, तर तो आशय आपण समरस होऊन वाचतो. जर एखादे विज्ञानाचे पुस्तक वाचणार असू, तर त्यातील नियम, सूत्रे यांचा पडताळा घेणारे वाचन करतो. त्यातील आशयाचे मूल्यमापन, चिकित्सा, विश्लेषण या बाबी अशा वाचनात येणारच. वैज्ञानिक आशयावर अनेक प्रश्न उपस्थित केले जातात कारण चिकित्सक वाचन हे प्रश्न उपस्थित करणारेच वाचन असते. एखाद्या आध्यात्मिक ग्रंथाचे वाचन श्रद्धाभावाने करण्याचा आपला उद्देश असेल; तर आपण त्या ग्रंथातील प्रत्येक शब्द प्रमाण मानायला लागतो. अशा ग्रंथाची पारायणे केली जातात. त्यावर कोणतेही प्रश्न उपस्थित केले जात नाहीत. प्रत्येक शब्द हा ईश्वरी उच्चार आहे, असे त्याकडे पाहिले जाते. अशा प्रकारे जसा उद्देश तसे वाचन केले जाते. लेखाच्या पुढील भागात चिकित्सक वाचनावर एक दृष्टिक्षेप टाकला आहे.

**चिकित्सक वाचन :**

येथे चिकित्सक वाचनासाठी आपणास एका मुलीची गोष्ट दिली आहे. ती काळजीपूर्वक वाचा.

**गोष्ट एका मुलीची :**

एका मुलीची ही गोष्ट आहे. सुकन्या नावाची एक मुलगी असते. एके दिवशी, तिच्या आईला सांगते की, आजीसाठी ती जेवण घेऊन जाते. जंगलातून जात असताना वाटेत ती व्यर्थ वेळ घालवते. आजीसाठी सुंदर फुले वेचते. तेवढ्यात एक अपरिचित लबाड लांडगा तेथे येतो आणि तिला विचारतो, की येथे काय करते आहेस? ती त्याला सांगते की, या जंगलात एक झरा आहे. त्या झऱ्याच्या काठी माझ्या आजीचे घर आहे. तेथे ती राहते. मी तिला भेटायला चालली आहे. हे ऐकून तो लबाड लांडगा मुलगी फुले वेचत



अनुक्रमणिका

असताना मधल्या रस्त्याने आजीच्या घरी जातो. तो आजीला बाहेर जणू तिची नात सुकन्या आल्याचे भासवतो आणि घरात प्रवेश मिळवतो. तो त्या आजीला गिळून टाकतो आणि आजीच्या बिछान्यात पडून मुलीची वाट बघतो. काही मिनिटांत ती मुलगी तेथे येते; तर तिला तिची आजी फार विचित्र भासते. तेवढ्यात हा लबाड लांडगा बिछान्यातून बाहेर उडी मारतो आणि तिला खायला पाहतो. तेव्हा सुकन्येला लक्षात येते की, बिछान्यातील व्यक्ती माझी आजी नसून तो लांडगा आहे. ती मदतीसाठी रडू लागते. जवळच असलेल्या एका लाकूडतोड्याला तिच्या रडण्याचा आवाज ऐकू येतो. तो लाकुडतोड्या त्या लांडग्याला पकडतो आणि आजीला त्याच्या पोटातून उगळायला सांगतो; आणि त्या लांडग्याला दूरवर जंगलात सोडतो. पुढे आजी आणि सुकन्या जेवण करीत खूप गप्पा मारतात. (स्रोत : Little Red Riding Hood by Leanne Guenther online)

या कथेची चिकित्सा करण्याचा येथे प्रयत्न केला आहे. त्यासाठी लेविन्सन आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी मांडलेले प्रारूप विचारात घेतले आहे. लेविसन (Lewison), फ्लिंट (Flint), वन सल्यूज (Van Sluys), यांनी केलेल्या संविधानात सारांशरूपाने चिकित्सक साक्षरतेचे चार पैलू सांगितले आहेत. ते पुढील प्रमाणे आहेत-

१) आशयवस्तूच्या सामान्य स्थानाला धक्का देणे

२) बहुआयामी दृष्टिकोनाची पृच्छा करणे

३) सामाजिक-राजकीय प्रश्नावर प्रकाश टाकणे

४) सामाजिक न्यायासाठीची कार्यवाही

या चार पैलूंच्या साहाय्याने आपण दिलेल्या कथेचे चिकित्सक वाचन करू शकतो. त्यासाठी दिलेल्या कथेवर काही प्रश्न उपस्थित करण्याचा येथे प्रयत्न केला आहे.

१. आशयवस्तूच्या सामान्य स्थानाला धक्का द्यायचा असेल, तर पारंपरिक समजुती, विश्वास, सवयी, प्रस्थापित सिद्धांत, व्यवहार थेट प्रश्न उपस्थित करावे लागतात. आपल्या दैनंदिन करण्याची पृच्छा करण्यावर भर दिलेला असतो. संस्कृतीच्या माध्यमातून पारंपरिक नीति तत्त्वे कशी जनसामान्य वाचकावर थोपविली जातात याचा अनुभव येथे येतो. हा आशय वाचकाला कसा व्यवस्थाबद्ध करतो याचा प्रत्यय घेतला जातो. या सर्व बाबींचा उलगडा वाचकाला करता आला; तर तो आशयवस्तूच्या सामान्य स्थानाला धक्का देऊ शकतो. उदा. दिलेल्या कथेत महिलांचे जे स्थान आहे त्याबद्दल वाचक म्हणून तुम्हाला काय वाटते? अपरिचितांशी लहान मुलांनी बोलू नये कारण अपरिचितांपासून धोका संभवतो, हे नीतितत्त्व सांगणे, हा या कथेचा मूळ उद्देश आहे का? कथा महिलांसंबंधी पूर्वग्रह दुषित करणारी आहे का? लाकूडतोड्या आणि लांडगा हे दोन्ही पुरुष सत्तेचे प्रतिनिधी आहे म्हणून त्यांचीच सरशी या कथेत होते का? असा प्रश्न उपस्थित करण्यास येथे वाव आहे.

२. बहुआयामी दृष्टिकोनाची पृच्छा करताना पहिला प्रश्न येथे उपस्थित होतो तो म्हणजे, या कथेतील महिलांचा आवाज दडपविण्याची व्यवस्था केली आहे का? सुकन्या हे या कथेतील प्रमुख पात्र असूनही तिचे या कथेत काय स्थान आहे? तिचे वर्णन एक बेसहारा, कमकुवत, निर्बुद्ध व्यक्तिमत्त्व म्हणून का रंगविले आहे? जर ही कथा केवळ सुकन्येची कथा न राहता ती संबंध विश्वातील मुलींची कथा असेल; तर मुली प्रवळ, तर्कनिष्ठ, धैर्यशाली नसतात का? मुली ह्या शास्त्रज्ञ, शक्तिमान, युद्ध करू शकणाऱ्या नसतात का? ह्या प्रश्नांचा आढावा घेतला, तर आपल्या असे लक्षात येते, की ही कथा लैंगिकदृष्ट्या पूर्वगृह दूषित आहे. बहुआयामी दृष्टिकोनाची पृच्छा करताना आशयातील विविध घटकांतील विसंगतीचा शोध घेणे, कोणाचा आवाज अधिक प्रकटतो, तर कोणाचा आवाज दाबला जातोय याची सखोल चौकशी करून आपण बहुआयामी दृष्टिकोनाची पृच्छा करू शकतो.

३. कथेत लिंगसमभावासंबंधीचा पूर्वग्रह दूषित असणे, छळवणूक, दारिद्र्य यांवर प्रश्न उपस्थित करून सामाजिक-राजकीय प्रश्नावर प्रकाश टाकता येतो. कथेतील हे प्रश्न केवळ सुकन्या व आजीचे प्रश्न न राहता ते सामाजिक, राजकीय स्वरूप धारण करतात. पुरुषसत्तेचा दृष्टिकोन स्त्रियांना कसा दुबळा बनवितो, त्यांचा विश्वास कसा घालविला जातो, हे या कथेत दिसून येते. लांडगा व लाकुडतोड्या ही पात्रे पुरुषसत्तेचे प्रतिनिधित्व करतात. पुरुषसत्ता ही लबाड आणि ढोंगी असून ती मुले आणि स्त्रियांचे शोषण करणारी सत्ता आहे. हे या कथेतून दिसून येते. लांडग्याला न मारता जंगलात सुखरूप सोडले जाते.

४. सामाजिक न्यायासाठी वाचक स्वतः काही भूमिका घेतो. सामाजिक न्याय पायदळी तुडविला जात असेल, तर त्यावर प्रश्न उपस्थित करून समाजात आवाज उठविला जातो. या कथेत महिलांविषयी पूर्वग्रह दूषित असणे म्हणजे त्यांचे न्यायहक्क हिरावून घेण्यासारखे आहे. यावर वाचक प्रश्न उपस्थित करून भाष्य करू शकतो. सामाजिक न्याय

प्रस्थापित करणे म्हणजे सवंध मानवी समाजाला न्याय देणे होय. म्हणून वाचक हा प्रेक्षणीय न बनता तो सामाजिक न्यायासाठी कृतिशील बनला पाहिजे[७]. सत्तेतील विषमता, संवंध, विषमताधीष्ठीत जाणीवा, व्यक्तीचा समाजातील दर्जा उंचविण्यासाठी कार्यवाहीस्तव वाचकाने आवाज उठविणे म्हणजे सामाजिक न्यायासाठीची कार्यवाही करणे होय. अशा प्रकारे चिकित्सक वाचन करण्यासाठी अनेक पद्धती वापरता येऊ शकतात.

चिकित्सक वाचन करण्यासाठीची पहिली अट आहे ती आशयालाच समस्येत रूपांतरीत करण्याची; त्यातूनच उपस्थित केलेल्या प्रश्नांची उकल होण्याची शक्यता निर्माण होते. लेखकाचा हेतू साध्य करणारे वाचन हा झाला वाचनाचा एक सरळ अर्थ; पण आपल्या परिस्थितीत आशयाचा नवीन अर्थ शोधणारे वाचन हे चिकित्सक वाचन असते. त्यासाठी योग्य प्रश्न उपस्थित करावे लागतात. वरील प्रारूप त्यासाठी दिशादर्शक ठरू शकते.

**संदर्भ :**


१. Robert W. Rieber and aron S, Carton (Ed.) (1987). The Collected Works of L.S. Vygotsky, Volume, Thinking and Speech, Plenum Press, New York pp-93-94.

२. Fromm, E. (1952). The Fear of the Freedom. Britain. P-26

३. Freire, P. (1972) Pedagogy of the Oppressed. P-84, 100,101.

४. huja G. huja P. (1987) How to Increase Reading Spead, Procedure and Practices, New Delhi, Sterling Publishers

५. Pratham (2019) The thirteenth nnual Status of Education Report (SER 2018) p.2

६. Lewison, M. Flint, ., Van Sluys, K. (2002) Taking on Critical Literacy: The journey of newcomers and novices. Language rts, 79 (5) p 382-392.

७. Lee, Cheu-Jey. (2016) Biblical Reading and Critical Reading: How Do They Inform Each Other in Interpreting the Text? Journal of Educational Thought, Vol. 49, No. 2, 2016, p-144-159


●


**डॉ. नवनाथ तुपे,**

साहाय्यक प्राध्यापक, आजीवन अध्ययन व विस्तार विभाग, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ पुणे.

चलभाष : ९४२३३९३४७६






अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत





श्रद्धांजली

मोतीराम कटारे

# राजा ढालेंचे मराठीला योगदान

राजा ढाले यांचे मराठीला योगदान नोंदवायचे, तर दोन स्तरावर विचार करावा लागतो. एक : मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रात साठच्या दशकात त्यांनी लघुनियतकालिकांत बजावलेली कामगिरी आणि दुसरे म्हणजे दोन : फुले-आंबेडकरी वाङ्मयविश्वावर संशोधक, समीक्षक म्हणून उमटवलेला ठसा विचारात घ्यावा लागतो. मात्र इथे मराठीपुरताच विचार करणार आहोत.

**लघुअनियतकालिके :**

रमेश समर्थचा 'शब्द' हा १५जून १९५५ साली निघाला आणि तिथून लघुअनियतकालिकांची परंपरा सुरू झाली. राजानेही या चळवळीत उडी घेतली आणि १९६२ साली त्याने 'असो'चा अंक काढला. 'असो'चे सतरा अंक निघाल्याची नोंद मिळते. 'असो' बंद पडला; पण राजाने हार मानली नाही. १९६४ साली त्याने चंद्रकांत खोतला सोबत घेऊन 'आत्ता' काढले. 'आत्ता'चे सहा अंक निघाले. 'आत्ता'ही बंद पडले आणि त्याने तुलशी परब आणि वसंत दत्तात्रय गुर्जरला सोबत घेऊन 'येरू' काढले. लघुअनियतकालिकांच्या इतिहासात 'दैनिक चक्रवर्ती' काढून त्याने क्रांती घडवून आणली. या दैनिकाचा पहिला अंक ३ मे १९६१ साली निघाला. या दैनिकाचे बारा अंक निघाले. या अंकात 'येथे थोवाड रंगवून मिळेल' हे सदर राजा लिहायचा. ते प्रचंड गाजले. अनेक नामवंतांचे आपल्या अंकातून थोवाड रंगवले.

**प्रकाशक :**

राजा प्रकाशन क्षेत्रातही उतरला होता. राजा कवी होता साहजिकच कवितेवर त्याचे प्रेम असणार यात वाद नाही. त्यामुळे त्याने वसंत गुर्जर यांचा 'गोदी'(१९६७), सुभाष पांडुरंग सोमण यांचा 'एका नव्या शिशिरांत' (१९६८) आणि स्वत:चा 'स्थितीच्या कविता' असे तीन कवितासंग्रह काढले. पैकी 'गोदी'ने वसंत दत्तात्रय गुर्जर प्रकाशात आले.

**मराठी साहित्य चिंतन :**

अशोक शहाणेंनी 'आजकालच्या मराठी साहित्यावर क्ष किरण' टाकून ही सनसनाटी निर्माण करण्याची परंपरा रूजवली आणि त्यांच्या समकालीनांनाही त्याची लागण झाली. राजा ढालेंना गुरू मानत होते. त्यातूनच सनसनाटी विधाने करण्याची परंपरा निर्माण झाली असली तरी पारंपरिक जसा विचार करत होते त्यापेक्षा त्यांचा विचार वेगळा आहेच; पण त्याच्यात वास्तवही दडलेलं आहे. संत साहित्याचा विचार करताना त्याची समग्र पिढी ज्ञानेश्वरांपेक्षा तुकारामाच्या अधिक प्रेमात आहे. परंपरा निश्चित करण्याचा प्रयत्न म्हणूनही त्याकडे पाहता येईल.

'भारूड'ने केशवसुतांवर अंक केला होता. त्यात ह. शि. खरात यांचा लेख समाविष्ट होता. त्यात त्यांनी 'केशवसुतांनी मराठी कवितेला वळण लावण्याचे फार मोठे कार्य केले' असे विधान केले होते. या विधानावर भाष्य करताना राजा ढाले लिहितात, 'मराठी कवितेला वळण लावण्याचं फार मोठं कार्य त्यांनी केलं (म्हणजे ते पूर्वज. आम्ही वंशज : परंपरा) खऱ्या अर्थानं आधुनिक मराठी कवितेची सुरुवात त्यांच्यापासून झाली...(परंपरा) म्हणजे केशवसुतांकडून ह्यांनी 'आयात' केली. केशवसुतांनी परदेशातनं. तसं करणं भागच होतं कारण इंग्रजी वाङ्मयाच्या वाचनानं जे त्यांना नवीन गवसलं ते त्यांनी मराठीत प्रथम आणलं, आणि ते मराठीत रूजवलं. मान्य आहे. काय हो, इथं पेरण्याजोगा अनुभव मिळतच नव्हता का? तेव्हापासून आपण अन्नधान्यापासून ते डोक्यापर्यंत, अनुभवापर्यंत सारं आयात करणारे नापीक भीकमंगे का? नी त्या केशवसुतांचे तुम्ही चेले. ही foreign policy तेव्हापासूनची का? (परावलंबित्वाची!) तर केशवसुतांची बुद्धी परप्रकाशित. दुसऱ्यांचं बघून त्यांनी इथं लागण केली. स्वत:च्या साक्षात्कारानं नव्हे'. (पृ.२४ ते २६) इथं राजा ढाले ह.शि. खरातला खोडता खोडता चक्क केशवसुतही खोडतात. मराठी लेखकाचे हे षरावलंबित्व साठच्या दशकातील राजा ढालेपासून अनेकांनी मांडले आहे.

तुमचे कविताविषयक निकष परदेशी वा आयात केलेले असल्याने आम्हाला ते मान्य नाहीत. आमचे निकष आम्ही ठरवू, अशी एक भूमिका त्यामागे दिसते. त्यातूनच 'कलाकृती आणि निकष' सारखा लेख जन्माला असावा. त्यात ते लिहितात, 'निकष हे चांगल्या कलाकृतीवरून ठरवले जात असतील, तर ते त्या कलाकृतीच्या संदर्भातले नि म्हणूनच नव्या कलाकृतीच्या संदर्भात निरूपयोगी असतात कारण नवा आशय देणारी कलाकृती स्वत:चा असा नवा घाट घेऊन आलेली असते व जुन्या कलाकृतीबाबतच्या चौकटी मोडून व त्यावद्दलच्या

कल्पनांची व्याप्ती वाढवून देत असते. अशा वेळी रूढ निकष तिच्यासंदर्भात निरूपयोगी ठरतात म्हणूनच निकष हे सतत बदलणारे, असं म्हणण्यापेक्षा निकष नसतातच, असं म्हणणं अधिक योग्य, नि निकष करून नव्या कलाकृतीला असं पिंजऱ्यात डांबून व तिचा कित्ता गिरवून चांगली कलाकृती निपजेलच असे नाही: मग निकषांचा उपयोग काय? किंबहुना एका कलाकृतीची तुलना दुसरीशी करताच येणार नाही कारण ती एकमेवाद्वितीय असते.' राजा ढालेंची ही भूमिका स्वायत्ततावादी आहे आणि ती कलावादाचे अपत्य आहे. आपली ही कलावादी भूमिका त्यांनी वारंवार पुनरूक्त करीत आजवर जपली आहे, त्याचा प्रत्यय द. भि. कुलकर्णी यांच्या 'साहित्यव्यवहारातील आजच्या समस्या' या 'युगवाणी' (मे-जून १९७१) मधील लेखाला 'अस्मितादर्श'मधून दिलेल्या उत्तरातूनही येतो. द.भि.नी आपल्या लेखात 'दलित साहित्यापाशी स्वतंत्र भूमिका आहे का? स्वत:चे सर्वांगीण साहित्यशास्त्र आहे का?' असा मुद्दा उपस्थित केला होता. त्याला राजा ढालेंनी 'अस्मितादर्श' (दिवाळी १९७२) मधून दिलेलं उत्तर मराठी समीक्षकांच्या बौद्धिक दुष्काळावर ओढलेला कोरडा आहे. 'मराठीचं प्रचलित साहित्यशास्त्र संस्कृत + ग्रीक साहित्यशास्त्राचं बनलेलं आहे' हे त्यांनी ठासून मांडत साहित्यकृती आणि साहित्यशास्त्रही स्वयंभू असते हे सांगायलाही विसरत नाहीत. आंबेडकरी प्रेरणा प्रमाण मानणारे समस्त लेखक, समीक्षक सुरुवातीपासून कलावादाच्या विरोधी भूमिका घेत असताना ते कलावादाला चिकटून राहतात या मागचं नेमकं रहस्य काय असावं?



राजा ढालेचे हे कलावादी रूप जसे आपल्याला दिसले तसे नारायण सुर्वेंवरील लेखन वाचताना जीवनवादी भूमिकाही ते विचारात घेतात किंवा दलित साहित्यावरील चर्चेच्या निमित्तानेही जीवनवादी भूमिकेचा पुरस्कार केलेला दिसतो. काहींना ही विसंगती वाटण्याची शक्यता नाकारता येत नसली तरी हा रहस्यभेद करण्यासाठी चंद्रकांत पाटील यांची मदत होते. त्यांनी राजा ढाले हे अशोक शहाणे आणि रा. भा. पाटणकर यांचे शिष्य असल्याचा निर्देश केला आहे. प्रतिवाद खोडून काढण्यात पटाईत असणाऱ्या राजा ढाले यांनी तो नाकारलेला नाही. याचा अर्थ तो त्यांना मान्य आहे, असे दिसते. रा.भा.पाटणकर यांनी 'सौंदर्यमीमांसा' या आपल्या ग्रंथात 'द्विध्रुवात्मकते'चा सिद्धान्त मांडला आहे. अलौकिकतावाद व लौकिकतावाद या दोनही बाजू विचारात घेतल्याशिवाय साहित्यव्यवहाराला पूर्णत्व येत नाही, असे रा.भा.नी सिद्ध केले आहे. राजा ढालेंनी आपल्या समीक्षाविचारात या भूमिकेचाच स्वीकार केला आहे.

टीका नाही असं त्यांचं लेखन सापडणे विरळाच म्हणावे लागेल. ती निर्भीड आहे. समकालीनांनाही तिचे बळी व्हावे लागले आहे. इथे मराठी साहित्यिकांवरील टीकेचा मासला पाहणार आहोत. दैनिक 'चक्रवर्ती'मधील 'येथे थोबाड रंगवून मिळेल या सदरात चंद्रकांत पाटील यांचेही थोबाड रंगवलेले पाहायला मिळते. लेखाच्या पहिल्याच परिच्छेदात 'प्रा. चंद्रकांत पाटील हा लेखक संपला हेही उत्तमच। त्या लेखकाला श्रद्धांजली अर्पून दोन मिनिटं स्तब्धता पाळून पुन्हा सुरुवात'. निमित्त होते दिल्ली येथे भरलेले अनियतकालिकांचे प्रदर्शन व चर्चा. त्यासाठी 'वाचा ग्रुप'ने अंक करून प्रदर्शनासाठी घेऊन गेले होते. त्यात चंद्रकांत पाटील यांचा ' छोटी नियतकालिके आणि नवलेखक' हा लेख होता. टीका करावी असे लेखात काहीच नव्हते. तरीही राजा ढाले त्यांच्यावर घसरतात आणि त्यांना 'एक भम्पक माणूस आणि भम्पक कवी' असे संबोधतात. चंद्रकांत पाटील राजा ढालेंना माणूस म्हणून भम्पक वाटणे हा त्यांचा मतस्वातंत्र्याचा भाग असेल; पण पाटील जर भम्पक कवी असेल, तर ज्या अंकात पाटलांचे थोबाड रंगवले आहे त्याच अंकातून त्यांची कविता छापली आहे. इथे तत्कालीन वाङ्मयीन वातावरण निकोप असल्याचा प्रत्यय येतो.

राजा ढालेंच्या टीकेचे भालचंद्र नेमाडे यांनाही धनी व्हावे लागले आहे. ते लिहितात,'खरे तर नवे लिहिणाऱ्या माणसांनी शहरात वसाहती करून राहणे व अहंगंडांत असणे हे जसं यांना पटलंय तसंच शहरी लोकांबद्दल आपल्या कवितेत दम नसताना अकारण आगपाखड करणे या गोष्टीसुद्धा रोगटच. खरं तर औरंगाबादचं सगळं टोळकंच वेड्याच्या इस्पितळात जाण्यायोग्य झालं की काय कारण नेमाडे पाटील यांनी हल्ली हीच साहित्याबद्दलची चव आणि जाणीव दाखवलीय.' राजा ढालेंची वाङ्मयीन टीका समजून घेण्याची निकोप मानसिकता चंद्रकांत पाटील यांनी दाखवून पुढे राजा ढालेंवर दीर्घ लेख लिहून त्यांचं मोठेपण सांगण्याचा प्रयत्न केला. भालचंद्र नेमाड्यांच्या मात्र ही टीका जिव्हारी लागलेली दिसते. त्यांनी भविष्यात कधीच राजा ढालेंच्या वाङ्मयीन कर्तृत्वाविषयी लिहिले नाही. टाळता येत नाही म्हणून ओझरते उल्लेख केले. अशोक शहाणेही त्याला अपवाद नाहीत. मात्र नव्या पिढीतल्या मंगेश नारायणराव काळेने आपल्या 'खेळ'चा विशेषांक करून त्याच्या कर्तृत्वाची नोंद घेतली. राजाने मराठीला सोडचिठ्ठी देऊन दलित साहित्याच्या प्रवाहात सामील झाला नसता, तर मराठी साहित्याला आणि समीक्षेला नवी दिशा दिली असती.

●

**मोतीराम कटारे**

इ-मेल : motiramkatare@gmail.com



अनुक्रमणिका










पुस्तक परीक्षण

डॉ. संजय नगरकर

# नवसंशोधकांचा वाटाड्या : 'साहित्यसंशोधन : वाटा आणि वळणे'

संशोधन ही निरंतर चालणारी प्रक्रिया असते. तिला आदि असतो; परंतु अंत नसतो. 'साहित्य संशोधन'देखील त्यास अपवाद नाही. म्हणूनच केशवसुत म्हणतात त्याप्रमाणे, 'नांगरल्यावीण भुई जरी, असे कितीतरी' हेच खरे. पदवीसाठी वा व्यासंग / व्रत म्हणून अशा दोन पद्धतीने केल्या जाणाऱ्या साहित्य संशोधनाचा तुलनात्मक विचार करता, काही अपवाद वगळता पदवीसाठी केले जाणारे संशोधन हे नवसंशोधकांशी संबंधित असते. त्यातील एम. फिल.सारखी पदवी प्राप्त केल्यानंतर काही एक प्रमाणात संशोधकांना पुरोभूमी तयार होते; परंतु संशोधनाविषयीच आस्था नसेल व केवळ व्यावहारिकदृष्ट्या संशोधन होत असेल, तर अशा संशोधनाची अवस्था उरकून घेण्याची होते. अलीकडच्या काळात पदवीप्राप्तीसाठी संशोधनाच्या क्षेत्रात पदार्पण करणारे संशोधक हे उथळ आणि उतावीळपणे संशोधनाकडे पाहतात आणि त्यातूनच मग प्रसारमाध्यमे व विषय संशोधनाच्या क्षेत्रात समज-गैरसमज पसरू पाहतात.

गेली अनेक वर्षे अहमदनगर महाविद्यालय मराठी संशोधन केंद्राचे प्रमुख म्हणून काम पाहताना व स्वतःच एक सूक्ष्मदृष्टी असलेले संशोधक म्हणून विविध प्रबंध तपासताना डॉ. सुधाकर शेलार यांना जे जे काही बरे-वाईट अनुभव आले त्यातूनच प्रेरणा घेऊन त्यांनी नवसंशोधकांना काही एक वाट दाखवावी म्हणून वेळोवेळी लेख लिहून मार्गदर्शन केले. साहित्यातील विविध प्रवाह-प्रकारांच्या संशोधनासाठी उपयुक्त ठरणारा त्यांचा 'साहित्यसंशोधन : वाटा आणि वळणे' हा ग्रंथ नुकताच अक्षरवाङ्मय प्रकाशनाने प्रसिद्ध केला आहे. मराठी साहित्याच्या संशोधन क्षेत्रात गेली अनेक वर्षे निर्माण झालेली पोकळी भरून काढण्याचे कार्य या ग्रंथाने केले आहे. या क्षेत्रातील नेमकी उणीव हेरून डॉ. शेलार यांनी उपयोजित संशोधन व समीक्षेचा वस्तुपाठ त्यातून घालून दिला आहे. त्यामुळे त्यांचा हा ग्रंथ खरे तर ज्ञानक्षेत्रातील एक मौलिक भर टाकणारा ग्रंथ ठरणार आहे. केवळ संशोधकच नव्हे, तर संशोधन मार्गदर्शकांनाही मार्गदर्शक आहे.

खरे तर यापूर्वी स. गं. मालशे, सु. रा. चुनेकर, वसंत स. जोशी, उषा मा. देशमुख यांसारख्या मोजक्या अभ्यासक-संशोधकांनी साहित्यसंशोधन करू पाहणाऱ्या नवसंशोधकांसाठी उपयुक्त ठरणारे ग्रंथ साकार करून पायवाट तयार करून ठेवली आहे; परंतु तरीही या मूळ ग्रंथाचे वाचन- चिंतन करण्याची तसदी न घेता थेट प्रबंधलेखनाला हात घालणाऱ्या नवसंशोधकांची अवस्था अंधारात चाचपडणाऱ्या पांथस्थासारखी होते, आणि दुसरे म्हणजे संशोधन विषयक ज्ञान आणि संकल्पना या निरंतर बदलत असतात, म्हणून त्या अद्ययावत झाल्या पाहिजेत. या सर्व पार्श्वभूमीवर डॉ. शेलार यांचा सदर ग्रंथ पुढे आला आहे. ही आशादायी गोष्ट आहे. सुरुवातीला प्रस्तावनेतून त्यांनी वर्तमानात मराठी साहित्यसंशोधनाच्या क्षेत्रात होत असलेल्या नवसंशोधनाविषयी निराशेचा सूर आळवलेला असला तरी पुढे येणारे त्यांचे लेख हे अंधारात चाचपडणाऱ्या नवसंशोधकांना प्रकाशाची वाट दाखविणारे आहेत. म्हणूनच ग्रंथाला दिलेले, 'साहित्यसंशोधन : वाटा आणि वळणे' हे शीर्षक समर्पक वाटते.

सदर ग्रंथाच्या प्रारंभीच येणाऱ्या 'पदवीय संशोधनाची लेखन पद्धती : स्वरूप व दक्षता' या लेखाने सुरू झालेली ही लेखमाला साहित्यप्रकारनिष्ठ संशोधन (वैचारिक साहित्य, काव्य, चरित्र- आत्मचरित्र, कादंबरी, नाटक, कथा इ.) प्रवाहनिष्ठ संशोधन (मध्ययुगीन मराठी साहित्य, लोकसाहित्य) आंतरविद्याशाखीय संशोधन (सामाजिक शास्त्रे व साहित्य अनुबंध)अशा क्रमाने पुढे येते व अखेरीस नेमका कोणता विषय संशोधनासाठी निवडावा? या नवसंशोधकांना पडणाऱ्या यक्ष प्रश्नाला हात घालणारा 'काही संशोधन विषय : काही दिशा' हा लेख अनेक विषयांचे संसूचन करतो. वैचारिक सैद्धान्तिक संशोधनाचा विचार करताना कोणत्याही संशोधनाच्या मुळाशी एक तत्त्वमीमांसा असते. त्याचे भान ठेवून 'साहित्य आणि तत्त्वज्ञान' या लेखाने ग्रंथाचा समारोप होतो.

अकादमीक संशोधन कसदार व्हायचे असेल, तर काय शोधायचे असते, व कसे शोधायचे असते? याची प्रथमतःच



अनुक्रमणिका



जाणीव करून देताना प्रस्तावनेपासून संदर्भसूची करण्यापर्यंत ज्या पायऱ्या असतात त्याची क्रमवार मांडणी अत्यंत सोप्या पद्धतीने करून, संशोधनाचा पाया समीक्षा हा असतो याची ते जाणीव करून देतात. आजकाल प्रबंधलेखनात विश्लेषण-वर्णनावरच अधिक भर दिला जातो. मूल्यमापन, भाष्य या गोष्टींकडे दुर्लक्ष केले जाते. या त्रुटींवर बोट ठेवून संदर्भाबरोबरच स्वमताला किती महत्त्व असते, वाक्यरचनेचा एक बाज असतो. एवढेच नव्हे, तर जोडाक्षरे टंकित करतानाही कोणती काळजी घ्यायची असते? अशा बारीक-सारीक गोष्टींचीही माहिती दिलेली आहे. किमान 'प्रबंधलेखन' हे कसे शिस्तशीर व मूल्यगामी असावे? याविषयी पावलोपावली जाणीव करून दिली आहे.

विशिष्ट साहित्यप्रकार वा त्याच्याशी संबंधित साहित्यकृती संशोधनासाठी घेताना त्या साहित्यप्रकाराचा एक विशिष्ट पोत असतो. अभिव्यक्तीभिन्नतेची वैशिष्ट्ये असतात, याची जाणीव संशोधकांना असावी. संबंधित साहित्यप्रकाराची स्थल-कालविशिष्ट मूल्ये असतात, परंपरेची पार्श्वभूमी असते, त्या-त्या साहित्यिकाचा विशिष्ट प्रकृतिधर्म असतो, प्रकारभेद असतात, युगधर्म असतो. शैलीविशिष्टता असते. याचे भान प्रत्येक लेखामध्ये करून देताना डॉ. शेलार साहित्यसंशोधनात वापरल्या जाणाऱ्या संकल्पना, पारिभाषिक संज्ञा यांचे नेमके अर्थज्ञान असणे गरजेचे असल्याचे प्रतिपादन करतात. उदा- आशय आणि विषय यातील फरक, संदर्भसूची व ग्रंथनामसूची यातील फरक, निर्देशसूची व आकारविल्हे म्हणजे काय? संदर्भसाधनांचा शोध व संदर्भांचा वापर, अशा अनेकविध संशोधन मूल्यांचा ऊहापोह ह्या ग्रंथात केलेला आहे. यामागे त्यांचे सूक्ष्म निरीक्षण, नवसंशोधन अधिक सकस व्हावे ही तळमळ, संशोधनक्षेत्राविषयी आस्था दिसून येते. 'भाष्यकाराने वाट पुसतु' या उक्तीसह पुढीलांनाही दिशा देण्याची भूमिका दिसते.

या ग्रंथातील प्रत्येक लेखाचा स्वतंत्रपणे विचार करता, ग्रंथकाराचा त्यातून दिसून येणारा व्यासंग व विषयवैविध्य हे ठळक विशेष समोर येतात. तसे पाहता वैचारिक साहित्याचे संशोधन तसे आव्हानात्मक असते. त्यामुळे ह्या संशोधनविषयाकडे संशोधक फारसे वळत नाहीत. सदर ग्रंथातील 'वैचारिक साहित्याची समीक्षा आणि संशोधन : काही दिशा' या लेखातून "सलग लिहिलेल्या वा लेखस्वरूपात लिहिलेल्या व विचारांची चर्चा-चिकित्सा समाविष्ट असणाऱ्या लेखनाला वैचारिक साहित्य असे आपण संबोधतो." अशा साध्या-सोप्या व्याख्येसह वैचारिक साहित्याचा संकल्पनाव्यूह आपल्यापुढे मांडला जातो व वैचारिक साहित्याची नेमकी संकल्पना संशोधकाने समजून घ्यावी, त्याचा आशय-विषय, स्थल-काल व एकूणच वैचारिक साहित्याची वाटचाल, सामान्य तर्कशास्त्राची जाण, लेखनशैली व भाषाशैलीची वैशिष्ट्ये, तटस्थता, समीक्षक, संशोधक व भाष्यकार ह्या विविध भूमिका, अभ्यासार्थ संशोधन विषयाची फलश्रुती अशा अनेकविध मुद्यांचा ऊहापोह केलेला आहे. यातून किमान वैचारिक साहित्य संशोधनासाठी निवडण्यामागे असलेली अनास्था दूर होण्यास मदत होईल.

कवितेची समीक्षा या संशोधनाची सूत्रे उलगडून दाखविताना पूर्वपरंपरेसह कवितेची प्रकृतिवैशिष्ट्ये प्रकारभेद, वास्तवाचे काव्यरूप, विसंगती, सूचकतेचे सामर्थ्य, विषयानुसार वर्गवारी वा सूत्रे, भाष्यकाराची भूमिका, अभिव्यक्ती वैशिष्ट्ये व 'स्व' मताचे महत्त्व 'काव्यसमीक्षा आणि संशोधन : काही सूत्रे' या लेखातून प्रतिपादन केले आहे.

प्रबंधलेखनाचा एक साचा असतो. हे खरे असले तरी केवळ प्रघात म्हणून प्रबंधलेखन करू नये, याची जाणीव करून देताना 'चरित्र-आत्मचरित्र : समीक्षा व संशोधन' हा लेख पुढे येतो. यातून चरित्र, आत्मचरित्र, चरित्रात्मक वा आत्मचरित्रात्मक कादंबरी, आत्मकथन, स्वकथन यातील सीमारेषा धूसर असल्या तरी त्यात निश्चित एक प्रकृतिभेद असल्याचे स्पष्ट केलेले आहे. त्या त्या उपप्रकारानुसार संशोधकाची भूमिकादेखील स्वतंत्र असल्याचे स्पष्टपणे मांडलेले आहे. चरित्रातून नेमके काय शोधायचे असते? कादंबरी रूपातील होणारा संकर, त्यासाठी आवश्यक असणारी द्विपदात्मक अनुभूती व त्यावरील भाष्य कोणत्या पद्धतीचे असावे? या प्रश्नांची चर्चाच या लेखातून केलेली आहे.




संशोधकांच्या सर्वाधिक आकर्षणाचा व आवडीचा विषय म्हणजे 'कादंबरी' हा साहित्यप्रकार होय; परंतु कादंबरीचे संशोधन करताना तिचो घटकवैशिष्ट्ये लक्षात न घेता फक्त

कथानकाचे वर्णन, व्यक्तिरेखांची ओळख करून देताना कथानकाची पुनरावृत्ती हे दोष निर्माण होतात. 'कादंबरी साहित्यप्रकाराचे संशोधन - स्वरूपचर्चा' या लेखात कादंबरीची अभिव्यक्ती वैशिष्ट्ये व आशयाचे वेगळेपण, व्यक्तिरेखांची वर्तनमीमांसा, निवेदन व शैलीवैशिष्ट्ये, स्थल-काल-अवकाशाचा परीघ आणि महत्त्वाचे म्हणजे वापरलेल्या विशेषणांना पुराव्याची जोड देणे आवश्यक असल्याचे येथे सांगितले आहे. तसेच कथेच्या बाबतीतदेखील कथासंग्रह, संपादित कथासंग्रह, एकाच कथाकाराचे अनेक कथासंग्रह यांचा अभ्यास करताना त्यांचे-त्यांचे अंतःसूत्र पकडून कथात्मक घटकावयवांची समीक्षा व्हावी तसेच केवळ कथाच नव्हे, तर कोणत्याही साहित्यप्रकाराचे संशोधन करताना संदर्भसाधनांना साह्यभूत 'कथासाहित्य प्रकाराचे संशोधन' या लेखातून दिला आहे. तसेच केवळ कथांचे गुणगान नव्हे, तर त्या लेखनाच्या मर्यादाही तर्कसंगतपणे दाखविण्याचे धाडस संशोधकांनी दाखविले पाहिजे, असे स्पष्टपणे सांगितले आहे.

'नाटक' हा एक संमिश्र साहित्यप्रकार आहे आणि नाटकाचे संशोधन करताना त्याच्या 'संहितेपासून सुरू होणारे संशोधन संहितेजवळच थांबते' याचे भान ठेवणे आवश्यक असल्याचे मत येथे नोंदविले आहे. त्यादृष्टीने 'नाटक : संशोधन स्वरूप' हा लेख येतो. या लेखातून संस्कृत व इंग्लिश नाट्यमीमांसेचा आधार घेण्याची गरज संहितेचे समीक्षण व नाट्यप्रयोगाच्या परीक्षण-समीक्षणातील भेद, नाटकाचा आत्मा असलेल्या संवादरचनेमागील समाभाषाविज्ञानाची संदर्भसापेक्षता, आशय-विषयानुसार पडणारे प्रकारभेद व त्यावर भाष्य करताना करावयाची तथ्यमांडणी, नाट्यतंत्र व आशय यांचा सहसंबंध अशा आगळ्यावेगळ्या पैलूंवर प्रकाश टाकला आहे.

'व्यक्ती आणि वाङ्मय' हा संशोधनविषय सवंग झाल्यामुळे आता हद्दपार करावा की काय? असा प्रश्न उपस्थित होतो. ह्या विषयावरील संशोधनाचे स्वरूप स्पष्ट करताना ग्रंथकाराने ह्या विषयावर केल्या जाणाऱ्या संशोधनातील अनेक दोषांवर प्रकाश टाकताना गौरवगाथेपेक्षा निवडलेली व्यक्ती व तिच्या वाङ्मयाचा सहसंबंध शोधताना संशोधनार्थ लेखकाचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व व लौकिक व्यक्तिमत्त्वाचा शोध, साहित्यातील मौलिक योगदान व वेगळेपण, लेखनामागील प्रेरणा व प्रवृत्ती, स्थल-काल-अवकाशाचा प्रभाव, शैलीवैशिष्ट्य समकालीन लेखकांशी तुलना करीत करीत व्यक्ती आणि वाङ्मय हा विषयदेखील सकस होऊ शकतो, असा आशावाद व्यक्त केला आहे.

प्रवाहनिष्ठ संशोधनाशी संबंधित 'मध्ययुगीन मराठी साहित्याचे संशोधन : काही सूत्रे', 'लोकसाहित्य : संशोधन स्वरूप' ह्या लेखांमधून अलक्षित व अज्ञात अशा ग्रंथांना वा लोकबंधांना प्रकाशात आणणे आवश्यक असते. तसेच पूर्वसुरींनी जे संशोधन केले त्याची री न ओढता, आपण काय नवा अन्वयार्थ शोधला? त्या त्या काळाचा युगधर्म व संबंधित साहित्य, स्वामीभक्तीचा मोह टाळण्याची आवश्यकता, प्रवाहांमधील समान सूत्रे, अभिव्यक्तीच्या पद्धती, गुप्त व सांकेतिक लिप्यांचा अभ्यास, धर्मनिरपेक्ष भूमिका, पाठभेद तपासण्याचे कौशल्य, अशा महत्त्वपूर्ण मुद्द्यांवर प्रकाश टाकला आहे.

'आंतरविद्याक्षेत्रीय सहसंबंध आणि संशोधन' हा लेख राज्यशास्त्र व साहित्य, इतिहास व साहित्य, अर्थशास्त्र व साहित्य, विज्ञान व साहित्य, मानसशास्त्र व साहित्य, वाङ्मयेतिहास अशा अनेकविध सामाजिक शास्त्रांचा व साहित्याचा अनुबंध कसा शोधावा? का शोधावा? या प्रश्नांची उत्तरे देतो. तसेच नवसंशोधकांना अनेकविध विषयांचे संशोधन करण्याचे संसूचन करतो.

त्या-त्या लेखांमध्ये संशोधन कशा पद्धतीने झाले पाहिजे, हे स्पष्ट करताना काही विधानांमधून त्यांची स्वतःची संशोधनात्मक मते व विचारही येऊन जातात. या विधानांमधून संशोधकाची भूमिका विज्ञाननिष्ठ असावी, पुरोगामीत्व जपत त्याने नीरक्षीरविवेक ठेवला पाहिजे (मग ते आध्यात्मिक साहित्य असले तरी), व्यक्ती आणि वाङ्मयासारख्या विषयांची केवळ गौरवगाथा होण्याचा धोका अशा वेगवेगळ्या मतांमधून त्यांची पुरोगामी भूमिका असल्याचे दिसते. हे सर्व लेख लिहिताना त्यांनी यापूर्वीच 'लढत : एक चिकित्सक अभ्यास' या स्वतःच्या एम. फिल. पदवीसाठी सादर केलेल्या प्रबंधिकेचा ग्रंथ प्रसिद्ध करून दर्जेदार प्रबंध-प्रबंधिकेचा वस्तुपाठ घालून दिला आहे. त्यामुळे त्या-त्या लेखात काही उदाहरणे वा नमुने आलेले नाहीत ही त्रुटी दूर होते. अर्थात, म्हणतात ना 'घोड्याला पाण्यापर्यंत नेता येते; परंतु पाणी कसे प्यायचे, प्यायचे की नाही? हे त्या घोड्याने ठरवायचे असते.' त्यादृष्टीने या ग्रंथातील लेखांचा अभ्यास करून नवसंशोधकांनी संशोधनक्षेत्रात प्रवेश करावा. त्यामुळे त्यांना योग्य दिशादर्शन होईल म्हणूनच डॉ. सुधाकर शेलार यांनी सदर ग्रंथाद्वारे 'नवसंशोधकांचा वाटाड्या' म्हणून खूप मोलाची भूमिका साकारली आहे.

●

**डॉ. संजय नगरकर**
प्राध्यापक व मराठी विभागप्रमुख
डॉ. बाबासाहेब आंबेडकर महाविद्यालय, औंध
पुणे - ६७.
चलभाष : ९०९६८७५७३७









पुस्तक परीक्षण

# उद्योजकांची प्रेरणादायी चरित्रे



**अश्विनी धोंगडे**

मराठी माणूस उद्योगक्षेत्रात मागे राहतो, असे नेहमीच म्हटले जाते आणि त्यात थोडे तथ्यही आहे. टाटा, बिर्ला, अंबानी या नावांशी स्पर्धा करणारी नावं नसतीलही मराठी! पण किर्लोस्कर, शिर्के, गरवारे ही नावेही कमी महत्त्वाची नाहीत. उद्योगाचा पसारा मांडण्यासाठी अफाट कर्तृत्व उद्योजकाकडे असावे लागते. अशा कर्तृत्ववान माणसांची महाराष्ट्रात वानवा नाही. लघु आणि मध्यम उद्योग उभारणारे शेकडो उद्योजक इथे आहेत, आणि स्टार्टअपच्या प्रोत्साहनामुळे त्यांच्यात दिवसेंदिवस भर पडत आहे. अशा उद्योग निर्मात्यांचे कार्यकर्तृत्व कायम अंधारात राहते कारण चरित्रे लिहिली जातात ती फक्त उद्योगाचा प्रचंड विस्तार असणाऱ्या महनीयांची. ही गोष्ट नेमकेपणाने लक्षात घेऊन श्री. वि. दा. पिंगळे यांनी आत्तापर्यंत चार पुस्तके लिहून काही मराठी उद्योजकांचे कार्यकर्तृत्व प्रकाशात आणले आहे. प्रेरणास्त्रोत मराठी उद्योजक (भाग४) या पुस्तकात त्यांनी पुण्यातील पाच उद्योजकांच्या कर्तबगारीचा प्रवास थोडक्यात मांडला आहे.

या पाचही उद्योजकांमध्ये काही गोष्टी समान आहेत. कुणीही उद्योजकाच्या घरी जन्माला येऊन वडिलोपार्जित उद्योग पुढे नेलेला नाही. जे काही जग त्यांनी उभे केले आहे ते त्यांचे स्वतःचे कर्तृत्व आहे, तरीही आईवडिलांचे नैतिक पाठबळ आणि उत्तेजन त्यांना लाभले आहे, याची कृतज्ञ जाणीव या सर्वांना आहे. बहुतेक जण ग्रामीण भागातून आणि गरीब शेतकरी वा कामगार घरातून आलेले आहेत. औपचारिक शिक्षण घेणेही अनेकांना परवडणारे नाही. त्यामुळे उच्च शिक्षणसुद्धा मधेच सोडून त्यांना पैशासाठी विद्यार्थी दशेतच कामधंदा स्वीकारावा लागला आहे. एखाद्या उद्योगाचे स्वप्न पाहिले आणि ते लगेच साकार झाले, अशी गोष्ट आयुष्यात कधीच होत नाही. वास्तव आणि स्वप्न यात भीषण दरी असते आणि ती ओलांडणे सोपी गोष्ट नसते. मजुरीपासूनची कामे करत करत काहींनी अनुभवातून तंत्रज्ञान शिकून घेतले, काहींना देवासारखा कोणी आधार देणारा भेटला; पण या वाटेपर्यंत जाणे आणि आपल्याला काय करायचे आहे हे स्वच्छ सूर्यप्रकाशासारखे दिसणे यासाठी अहोरात्र स्वतःला कामात झोकून द्यावे लागते. शेड झाडण्यापासून मॅनेजिंग डायरेक्टरच्या खुर्चीत बसण्यापर्यंत मधल्या सर्व भूमिका निभवाव्या लागतात. धंद्याचा जम बसेपर्यंत अनंत अडचणी येतात. पैसे ही तर सगळ्यात मोठी अडचण! फसवले जाणे, मालाला उठावच नसणे, वसुली न होणे, असंतुष्ट, गैरहजर कामगार अशा अडचणींशी दोन हात करताना नैराश्य येऊन पुन्हा पुण्यातून गावाकडे परतलेले आणि पुन्हा इथे येऊन नव्याने उद्योगाचा संसार मांडणारेही आहेत. संघर्ष, स्पर्धा, मंदी यावर कष्ट, जिद्द आणि महत्त्वाकांक्षा यांनीच मात करता येते. असे काट्याकुट्याच्या वाटेतून आलेले उद्योजक इथे भेटतात, म्हणून त्यांचे आयुष्य हे चरित्र न वाटता एकेक 'अद्भुत' कथा वाटते. गरिबीचे चटके सोसल्याने ते प्रामाणिक आहेत आणि त्यांना कामगारांच्या परिस्थितीची जाणीव आहे. समुद्राच्या पाण्यातील वाफेने मेघ बनतात आणि पावसाच्या रूपाने ते घेतलेले पाणी परत करतात, तसे या उद्योजकांनीही समाजाचे ऋण मान्य करत, ज्या समाजातून ते वर आले, त्यातल्या गरजूंना मोठाच हात देण्याची कृतज्ञता दाखवली आहे.

सिद्धेश्वर उद्योग समूहाचे विकासआबा ताकवणे एका शेतकरी परिवारातून आले आहेत. दहावी नापास झाल्यावर गावात त्यांनी उसतोडणी आणि शेतीची कामे मजुरीने केली. नशीब बदलण्याच्या जिद्दीने पुण्यात आले. फॉरमायका, बजाजमध्ये रोजाने काम केले. मिळेल तेथे माळीकाम केले. नगरच्या कायनेटिक कंपनीचे छोटे कॉन्ट्रॅक्ट मिळाले. ही त्यांच्या आयुष्याला वळण देणारी घटना होती. पुढे लेथमशीन घेऊन कामे सुरू केली, आणि दोन-चार वर्षांत त्यांच्या उद्योगाचा विस्तार वाढू लागला. उत्तम गुणवत्ता, गोड स्वभाव, वेळेत काम, संवाद कौशल्य या गुणांच्या जोरावर आज ते काही देशांमध्ये बुलेट ट्रेनसाठी ५८ वेगवेगळे पार्ट्स पुरवण्याइतके मोठे झाले आहेत. वडिलांचे छत्र लहानपणीच हरवल्यावर अनिल घुबे यांनी मामाकडे सर्व प्रकारची घरकामे करून आपले शिक्षण पूर्ण केले. भगवंत चन्नेवाडकर यांनी सातव्या, आठव्या वर्षापासून जंगलात जाऊन बांबू काढण्याचे काम अनवाणी पायाने केले. रोजची १४ किलोमीटरची पायपीट जंगलातून करत माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. सदरा शिवताना सुईचे घाव फक्त सदऱ्यालाच नाही. तर काळजालाही सहन करावे लागतात. हे सत्य उमजलेल्या मदन ठोंबरे यांना गरिबीनेच उद्योजक बनण्याची प्रेरणा दिली, लढायला, संघर्ष करायला, श्रम करायला शिकवले. पॉलिटेक्निकच्या दुसऱ्या वर्षात वडिलांचे छत्र हरवल्यावर आईने नोकरी करून हणमंतराव गायकवाड यांना शिकवले. शून्यापासून सुरुवात करून त्यांच्या 'भारत विकास ग्रुप'चे रोपटे इतके आकाशावर गेले, की त्यांच्या वटवृक्षाखाली ६० हजार कुटुंबांना सावली मिळते आहे.

या कथा म्हणजे चमत्कार नाही. त्यामागे कठोर परिश्रम, धाडसी वृत्ती, निर्णय घेण्याची प्रचंड क्षमता आणि सर्वांना एकत्रित घेऊन जाण्याची वृत्ती आहे. केवळ विद्यार्थी आणि होतकरू तरुणच नव्हे, तर आयुष्यात काही ध्येय ठेवणाऱ्या प्रत्येकालाच ही छोटी चरित्रे प्रेरणादायक आहेत. ●

**प्रेरणास्रोत मराठी उद्योजक : भाग ४ / लेखक : वि. दा. पिंगळे / प्रकाशक : शब्दाई प्रकाशन, पुणे / संपर्क : ९८८१२३५०३३**









भाषण

**प्रा. विश्वास वसेकर**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा सासवड आणि आचार्य अत्रे विकास प्रतिष्ठान यांच्या संयुक्त विद्यमाने सासवड येथे झालेल्या आचार्य अत्रे साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणातून...



## २२ वे आचार्य अत्रे मराठी साहित्य संमेलन, सासवड

**शि**रीष पैंचे 'पप्पा' नावाचे एक सुंदर पुस्तक आहे. त्यात त्या लिहितात, ''पप्पा म्हणजे विनोदाचा एक प्रचंड धबधबा आहे, असं आम्हीसुद्धा म्हणतो खरं; पण पप्पांच्या जीवनात हशांचा गडगडाट आणि टाळ्यांचा कडकडाट यांचाच कोलाहल इतका माजला आहे, की त्यांच्या मागचे त्यांच्या अंतःकरणातले हुंदके कुणालाच ऐकू येत नाहीत. जगण्यात मौज आहे, असा संदेश देणाऱ्या पप्पांच्या अंतःकरणात विरागी वृत्तीचं कूस वारंवार सलत असावं असा दाट संशय आहे... आपल्या स्वतःच्या भव्यतेचंही विडंबन करून लाखो लोकांना पोट दुखेपर्यंत हसवणाऱ्या पप्पांच्या विनोदात कुठं तरी खोल खोल एक प्रकारचा कडवटपणा असावा, असं मला नेहमी वाटतं.''

इथं माझा शिरीष पैंशी मतभेद आहे. अत्र्यांच्या विनोदामागे कडवटपणा नसून त्यांच्या विनोदाला दुःखाचे आणि करुणेचे अधिष्ठान आहे. या दृष्टिकोनातून अत्र्यांना समजून घेतले पाहिजे.

आचार्य अत्रे यांच्या लेखनात एक मातेसमान हळवेपणा आहे हे त्यांचे विनोदेतर वाङ्मय विशेषतः मृत्युलेख वाचताना जाणवते. पंडित नेहरूंवर कायम जहाल टीकेची झोड उठवणारे अत्रे त्यांच्या मृत्यूनंतर मात्र त्यांच्यावर चिरंतन शिलालेखासारखा गौरवलेख लिहितात किंवा झाडून साऱ्या मवाळांची मनसोक्त टिंगलटवाळी करणारे अत्रे मरणाच्या मांडीवर शांतपणे पहुडण्याच्या तयारीत असणाऱ्या साने गुरुजींचा कृश देह पाहून डोळ्यांत टपोर अश्रू आणू शकतात, हे अन्यथा असंभव होते. ●



कार्यवृत्त

प्रकाश पायगुडे

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे कार्यवृत्त नोंद

## (१ जुलै २०१९ ते ३० सप्टेंबर २०१९)

**१) दि. ४ जुलै २०१९ : विशेष कार्यक्रम :**

महाराष्ट्र साहित्य परिषद आणि नाट्यगंध ग्रुप यांच्या संयुक्त विद्यमाने नाट्य अभिवाचनाचा विशेष कार्यक्रम आयोजित केला होता. नाटककार जयवंत दळवी लिखित 'सावित्री' या नाटकाच्या काही भागांचे नाट्यअभिवाचन केले गेले. नाट्यगंध ग्रुपच्या डॉ. मधुरा कोरान्ने, चित्रा देशपांडे, रंजना पंडित, प्रतीक ढवळीकर यांनी प्रभावी अभिवाचन सादर केले.

**२) दि. १० जुलै २०१९ : जी. ए. कुलकर्णी जयंती कार्यक्रम :**

महाराष्ट्र साहित्य परिषद आणि जी. ए. कुलकर्णी कुटुंबीय यांच्या संयुक्त विद्यमाने जी. ए. कुलकर्णी यांच्या ९६व्या जयंतीनिमित्त लेखिका मंगला गोडबोले यांच्या उपस्थितीत जीए आणि सुनीता देशपांडे यांच्या पत्रांचे अभिवाचन सादर करण्यात आले. गिरीश कुलकर्णी व माधुरी पुरंदरे यांनी या निवडक पत्रांचे अभिवाचन केले. मंगला गोडबोले व जीएंच्या भगिनी नंदा पैठणकर उपस्थित होते. अरभाट फिल्म्स निर्मित संस्थेचा हा कार्यक्रम होता. पत्रांचे संकलन गिरीश कुलकर्णी यांचे होते. पार्श्वसंगीत मंगेश धाकडे यांनी दिले होते. मंचावरील दृश्यरचना सत्यजित पटवर्धन यांची होती. मंगला गोडबोले यांनी मनोगत व्यक्त केले.

**३) दि. १८ जुलै २०१९ :** शाहीर अण्णाभाऊ साठे पुण्यतिथीनिमित्त दरवर्षीप्रमाणे यंदाही वेगळा कार्यक्रम सादर केला गेला. महाराष्ट्र साहित्य परिषद व शाहीर हिंगे लोककला प्रबोधिनी यांच्या संयुक्त विद्यमाने 'साहित्यिकांची शाहिरी' हा पोवाड्यांचा कार्यक्रम झाला. शाहीर अण्णाभाऊ साठे, स्वातंत्र्यवीर सावरकर, ग. दि. माडगूळकर इत्यादि साहित्यिकांचे पोवाडे सादर केले गेले. शाहीर हेमंत राजे मावळे, प्रा. संगीता मावळे, महादेव जाधव, होनराज राजे मावळे, मुकुंद कोंडे, राजकुमार कोंडे, राजकुमार गायकवाड, लक्ष्मण चव्हाण, अरुणकुमार बाभुळगांवकर, सविता वाडेकर, प्रज्ञा काळे, पूजा माळी या शाहीर हिंगे लोककला प्रबोधिनीच्या कलाकारांनी भाग घेतला.

**४) दि. २२ जुलै २०१९ : कै. सोनोपंत मामासाहेब दांडेकर स्मृती पुरस्कार समारंभ :**

डॉ. श्रीपाद जोशी (इंदूर) यांना, त्यांच्या 'मानवी स्वभावाचे त्रिगुणात्मक विश्लेषण या ग्रंथाबद्दल मामासाहेबांच्या नावाचा पुरस्कार व मोहनबुवा रामदासी (ता. कर्जत, जिल्हा अहमदनगर) यांना संतसाहित्यातील लक्षणीय योगदानाबद्दल कै. रवींद्र भट पुरस्कार डॉ. अभय टिळक यांच्या हस्ते देण्यात आला. व्यासपीठावर स्वामी मकरंदनाथ व समर्थ रामदास वंशज उपस्थित होते.

**५) दि. २३ व २४ जुलै २०१९ : माजी संमेलनाध्यक्ष राजेंद्र बनहट्टी गौरव व्याख्यानमाला** ही दोन दिवसीय व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली होती. विधानसभेच्या उपाध्यक्ष डॉ. नीलमताई गोऱ्हे यांची 'स्त्री आणि समाजकारण' व 'स्त्री आणि राजकारण' या विषयांवर सलग दोन दिवस व्याख्याने झाली. उपस्थित श्रोत्यांच्या प्रश्नांना त्यांनी व्याख्यानांच्या शेवटी यथोचित उत्तरे दिली. या वेळी चैतन्य बनहट्टी व बनहट्टी कुटुंबीय आवर्जून उपस्थित होते.

**६) दि. ३० जुलै २०१९ :** संत सावता माळी पुण्यतिथी पूर्वसंध्येला वैष्णवी भक्ती मंडळाचा 'संत सावता माळींचे चरित्र कथन व अभंग गायन' हा कार्यक्रम सादर झाला. व्यासपीठाजवळ दर्शनी भागात विठ्ठल रखुमाई यांची मनोवेधक मूर्ती व संत सावता माळी यांची प्रतिमा ठेवण्यात आली होती- त्यांचे पूजन मान्यवरांच्या हस्ते होताच 'संत शिरोमणी ज्ञानेश्वर माउलींची प्रतीकात्मक पालखी व दिंडी परिसरात काढण्यात आली. पालखीच्या पुढे ग्रंथालय सेवक शिवाजी पाळंदे यांनी भगवा झेंडा मिरवीत आणला व भजनी मंडळातील इतर महिलांनी पालखी धारण केली होती. या सर्वांमुळे भक्तिमय वातावरण निर्माण झाले. वैष्णवी भक्तिमंडळाच्या संचालिका व ग्रंथालय सेविका सौ. शोभाताई कुलकर्णी यांना गौरवचिन्ह देऊन सन्मानित करण्यात आले. तसेच त्यांच्या सहकारी स्मिता पिंपळे, मीनाक्षी केळकर, कल्याणी सराफ, मधुरा खिरे, सुजाता कुकडे, राखी भुतडा, आशा संत यांना गुलाबफुले देण्यात आली. माधव खिरे यांनी पेटीची साथ व अविनाश असलेकर यांनी तबल्याची साथ केली. भजनानंतर आरती व प्रसाद वाटप झाले.

**७) दि. ३१ जुलै २०१९ : विशेष कार्यक्रम : लोकमान्य टिळक स्मृती शताब्दी व्याख्यान :**

लोकमान्य टिळकांचे स्मृती शताब्दी वर्ष दि. १ ऑगस्ट २०१९ पासून सुरू होत आहे. यानिमित्त संपूर्ण वर्षभर विविध संस्थांतर्फे अनेक कार्यक्रम सादर होणार आहेत. म्हणून आज या स्मृतिशताब्दीवर्षाच्या पूर्वसंध्येला परिषदेतर्फे 'टिळक युग' या विषयावर डॉ. सदानंद मोरे यांचे विशेष व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. लोकमान्य टिळकांचे वंशज आणि दै. केसरीचे विश्वस्त संपादक डॉ. दीपक टिळक हे ह्या कार्यक्रमाचे प्रमुख







अनुक्रमणिका

अतिथी म्हणून उपस्थित होते. लोकमान्यांच्या प्रतिमेचे मान्यवरांच्या हस्ते फुले अर्पण करून पूजन झाल्यावर कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक व प्रमुख अतिथी डॉ. दीपक टिळक यांनी मनोगत व्यक्त केले. तत्पूर्वी डॉ. टिळकांच्या तर्फे व हस्ते प्रा. मिलिंद जेशी यांना लोकमान्य टिळकांची मूर्ती भेट देण्यात आली. डॉ. मोरे यांचे व्याख्यान झाले.

**८) दि. २ ऑगस्ट २०१९ : लोकशाहीर अण्णाभाऊ साठे जन्मशताब्दीनिमित्त परिसंवाद :**

डॉ. प्रकाश खांडगे, डॉ. बजरंग कोरडे, डॉ. माधवी खरात, वि. दा. पिंगळे यांनी परिसंवादात अण्णाभाऊंविषयी मनोगते व्यक्त केली. परिसंवादाचे कुशल सूत्रसंचालन प्रा. मिलिंद जोशी यांनी केले व समारोपाचे विचार व्यक्त केले.

**९) दि. १४ ऑगस्ट २०१९ : डॉ. गं. ना. जोगळेकर स्मृती पुरस्कार प्रदान समारंभ :**

प्रसिद्ध भाषातज्ज्ञ व समीक्षक डॉ. कल्याण काळे यांना डॉ. निशिकांत मिरजकर यांच्या हस्ते हा पुरस्कार प्रदान करण्यात आला. डॉ. उज्ज्वला जोगळेकर यांनी मनोगत व्यक्त केले. प्रा. मिलिंद जोशी, डॉ. कल्याण काळे व अध्यक्ष डॉ. निशिकांत मिरजकर यांनी यथोचित भाषणे दिली. या वेळी श्री. पराग जोगळेकर व कुटुंबीय उपस्थित होते.

●

**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
संकलक : **दीपक करंदीकर,**
कार्यवाह, म.सा.प. पुणे

---

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
# इतर शाखा कार्यवृत्त नोंद

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा नाशिकरोड

**१) दि. १५ जून २०१९ : संवाद सृजनाशी पुष्प २२ वे नरेंद्र शाळीग्राम :**

कार्यक्रमास कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, अर्चना शाळीग्राम, सुधीर धिवरे, अभिजित कुलकर्णी, सविता भडकावडे, ज्ञानेश्वर जेऊघाले, वसंत गायधनी, अर्जुन टिळे आदी उपस्थित होते.

कार्यक्रम यशस्वितेसाठी सुजाता हिंगे, योगेश कापडणीस, वर्षा देशमुख, जयंत गायधनी, शिवाजी म्हस्के, संगीता पाटील यांनी प्रयत्न केले.

**२) दि. ३० जून २०१९ : पाचवी वार्षिक सर्वसाधारण सभा - २०१९ :** सभेत एकूण ७ ठराव मंजूर करण्यात आले. एकूण ७३ सभासद उपस्थित होते. आदर्श विद्यामंदिरचे संस्थापक रमेश औटे व प्रा. मनीषा विसपुते यांनी सभेचे आयोजन केले.

सुरेखा गणोरे यांनी सूत्रसंचालन केले. अलका अमृतकर यांनी स्वागत काव्य गायले. कामिनी तनपुरे यांनी प्रास्ताविक केले. संगीता पाटील यांनी आभार मानले. मंगला सातभाई यांनी गायलेल्या पसायदानाने सभेची सांगता झाली.

**३) दि. १३ जुलै २०१९ : रंग अक्षरांचे ५ वे पुष्प काव्य मैफल - अरुण इंगळे, गणेश मोगल, अलका अमृतकर :**

कार्यक्रमास कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, कवी राज शेळके, छायाचित्रकार संजय अमृतकर, ऋतुरंगचे सचिव प्रकाश पाटील, गझलकार गौरवकुमार आठवले, मनपाचे दत्तात्रय गोतिसे, कवी नितीन कोकणे, कार्यवाह रवींद्र मालुंजकर, कोषाध्यक्ष सुदाम सातभाई, अनिल गुरव, राजेंद्र उगले, वैशाली देशमुख, प्रशांत केंदळे, ज्योती कदम, ॲड. मुकुंद आढाव आदी उपस्थित होते.

**४) दि. २७ जुलै २०१९ : संवाद सृजनाशी पुष्प २३ वे डॉ. विद्या सुर्वे-बोरसे :**

कार्यक्रमास कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, नि. जि. न्या. वसंत पाटील, अश्विनी दापोरकर, प्रवीण मालुंजकर, आर. व्ही. जोशी, सोमनाथ सहाणे, अंबादास गोडसे आदी उपस्थित होते.

सूत्रसंचालन राहुल बोराडे, स्वागत काव्य संयुक्ता कुलकर्णी, प्रास्ताविक सुरेखा गणोरे, परिचय धारा भांड-मालुंजकर, आभार सुदाम सातभाई, पसायदान शिवाजी म्हस्के यांनी केले.

**५) दि. २ ऑगस्ट २०१९ : महाराष्ट्र (शाळांमध्ये मराठी सक्तीचे अध्यापन व अध्ययन) अधिनियम २०१९ - खुले चर्चासत्र :**

अध्यक्ष नीलिमा पवार, निमंत्रक उन्मेष गायधनी. या कार्यक्रमामध्ये अनेक नामवंतांनी सहभाग घेतला होता. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन कार्यवाह रवींद्र मालुंजकर व प्रा. डॉ. दिलीप पवार यांनी केले.

कार्यक्रमास शाखा उपाध्यक्ष दत्ता गायकवाड, दै. महाराष्ट्र टाइम्सचे संपादक शैलेंद्र तनपुरे, नाशिकरोड देवळाली व्यापारी बँकेचे निवृत्ती अरिंगळे, मविप्रचे राघोनाना आहिरे व भाऊसाहेब खातळे, व्ही. एन. नाईकचे, ॲड. तानाजी जायभावे, खाजगी शिक्षण संस्था मंडळाचे प्रवीण जोशी, साने गुरुजीचे गणपतराव मुठाळ, संस्कृती वैभवचे नंदन दीक्षित, साकेत प्रकाशनाच्या धारा भांड-मालुंजकर, लायन्स क्लब मनमाडचे डॉ. प्रताप गुजराथी, प्रा. गीतांजली पाटील, सल्लागार पांडुरंग चव्हाण, संजय जाधव.

**६) दि. १० ऑगस्ट २०१९ : संवाद सृजनाशी : २४ वे पुष्प विजयकुमार मिठे :**

कार्यक्रमास कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, वऱ्हाडी साहित्यिक

रवींद्र दळवी, कवी दत्ता अलगट, कवी राजेंद्र उगले, कवी अरुण इंगळे आदी उपस्थित होते. कार्यक्रम यशस्वितेसाठी शिवाजी म्हस्के, संगीता पाटील, कोषाध्यक्ष सुदाम सातभाई, प्रशांत कापसे, विष्णुपंत गायखे, गझलकार गौरवकुमार आठवले यांनी प्रयत्न केले.

**७) दि. २६ ऑगस्ट २०१९ : संवाद सृजनाशी : रौप्य महोत्सवी २५ वे पुष्प प्रा. मिलिंद जोशी :**

कार्यक्रमास महाराष्ट्र राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग मुंबईचे न्यायिक सदस्य मा. न्या. प्रदीप जोशी व तज्ज्ञ सदस्य डॉ. संतोष काकडे, कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, दिलीपराज प्रकाशनचे मधुर बर्वे, भोपाळचे कैलाश पराशर, प्रा. के. मा. मोरे, जिल्हा प्रतिनिधी अॅड. नितीन ठाकरे, आयकर अधिकारी अनिल गुरव आदी उपस्थित होते. कार्यक्रम यशस्वितेसाठी कामिनी तनपुरे, प्रशांत केंदळे, दशरथ लोखंडे, सुजाता हिंगे, मनोज नागपुरे, जयंत गायधनी आदींनी प्रयत्न केले.

●

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा सासवड, जि. पुणे

१) बारावीपर्यंत मराठी अनिवार्य करण्याच्या निर्णयाबद्दल शासनाचे अभिनंदनाचा ठराव सासवड साहित्य परिषदेतर्फे करण्यात आला. या निर्णयातील सर्व सहभागी मान्यवरांचे अभिनंदन करण्यात आले.

सासवड साहित्य परिषद शाखेच्या वतीने मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस व आमदार नीलम गोऱ्हे यांचे अभिनंदन करण्याचा ठराव करण्यात आला. दिल्ली येथून आकाशवाणीवरून मराठीसह अन्य प्रादेशिक भाषांतून प्रसारित होणारी वातमीपत्रे सुरू व्हावीत यासाठी खासदार सुप्रिया सुळे व खासदार सुनील तटकरे यांनी लोकसभेत आवाज उठविला. याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्याचा ठराव मंजूर करण्यात आला. साहित्य परिषदेचे सदस्य सतीश पाटील यांनी ठराव मांडला. सभेच्या अध्यक्षस्थानी साहित्य परिषद सासवड शाखेचे अध्यक्ष अॅड. अण्णासाहेब खाडे होते. कार्याध्यक्ष खाजाभाई बागवान, उपाध्यक्ष वंडूकाका जगताप, कोषाध्यक्ष महेश जगताप, कार्यवाह डॉ. जगदीश शेवते व कार्यकारिणी सदस्य उपस्थित होते.

●

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा मावळ

**१) दि. ३ मार्च २०१९ :** विविध स्मृती दिन शाखेमार्फत साजरे करण्यात आले. ७ जानेवारी डॉ. सरोजिनी बाबर जन्मशताब्दी, १७ जानेवारी शिवराम लक्ष्मण करंदीकर ५० वा स्मृतिदिन, २१ जानेवारी माधव ज्युलियन १२५ वी जयंती, २३ जानेवारी राम गणेश गडकरी स्मृतिशताब्दी व ३ मार्च हरी नारायण आपटे स्मृतिशताब्दी.

**२) दि. १५ मे २०१९ :** तळेगाव दाभाडे : इतिहास ते वर्तमान या संदर्भग्रंथांच्या निर्मितीत मसाप, मावळाचा सहभाग. प्रकाशन शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांच्या हस्ते झाले.

**३) १ जून २०१९ :** दीपक बिचे लिखित 'तुका झाला पांडुरंग व पसायदान' या पुस्तकांचा प्रकाशन सोहळा डॉ. रामचंद्र देखणे, अभय टिळक व अॅड. भास्करराव आव्हाड यांच्या उपस्थितीत संपन्न झाला.

**४) दि. १२ जून २०१९ :** मसापचे कार्यवाह दीपक बिचे यांच्या 'करिअरच्या दिशा' या पुस्तकाचे प्रकाशन संतोष खांडगे व सुरेश साखवळकर यांच्या हस्ते झाले.

**५) दि. २० जून २०१९ :** गणेश मोफत वाचनालयाच्या शताब्दीवर्षानिमित्ताने श्रीकृष्ण पुरंदरे यांनी 'माझा लेखन प्रवास' या विषयावर रंगतदार भाषेत विचार मांडले.

**६) दि. २५ जून २०१९ :** दीपक बिचे लिखित 'पसायदान पॉकेट बुक'चे प्रकाशन श्रीक्षेत्र भंडारा डोंगरावर झाले. मसाप अध्यक्ष सुरेश अत्रे व विश्वस्त शांताराम काराळे पाटील उपस्थित होते.

**७) दि. २६ जुलै २०१९ :** महाराष्ट्र साहित्य परिषद, मावळ ज्येष्ठ नागरिक संघ यांच्या संयुक्त विद्यमाने के. पु. ल., गदिमा व सुधीर फडके यांच्या स्मृतीस त्यांच्या वाङ्मय कृतीतून अभिवादन. सादरीकरण प्रा.दीपक बिचे, सुरेश अत्रे व श्रीकृष्ण पुरंदरे यांनी केले.

**८) दि. २९ जुलै २०१९ :** संत नामदेवांच्या ६९९ व्या पुण्यतिथीनिमित्त लोणावळा येथे 'संत नामदेवांचे पंजाबामधील कार्य' या विषयावर व्याख्यान आयोजित केलेले होते.

●

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा ठाणे जिल्हा

**१) दि. २३ मार्च २०१९ :** दीपक करंजीकर यांचे 'टायटॅनिक ते ट्रम्प' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले.

डॉक्टर वसुधा सहस्रबुद्धे, अध्यक्षा यांच्या हस्ते श्री. करंजीकर यांचे स्वागत करण्यात आले. पद्माकर शिरवाडकर, कार्याध्यक्ष यांनी प्रास्ताविक केले, तर चांगदेव काळे, कार्यवाह यांनी सूत्रसंचालन केले.

**२) दि. २५ मे २०१९ : प्रबोधन पुरस्कार वितरण आणि कथा अभिवाचन कार्यक्रम :**

मनोगत रामदास भटकळ यांनी व्यक्त केले. संजीव साने यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले. सुहास जोशी, श्रीरंग खटावकर, वासंती वर्तक यांनी अन्य भाषेतील कथांचे अभिवाचन केले. सुनंदा महाजन व अनघा भट यांना प्रबोधन पुरस्कार मान्यवरांच्या हस्ते

प्रदान करण्यात आला.

**३) दि. १० जून २०१९ : संस्थेचा चाळिसावा वर्धापन दिनः**

महाराष्ट्र साहित्य परिषद ठाणे जिल्हा शाखेचा ४० वा वर्धापन दिन मराठी ग्रंथसंग्रहालय येथे दि.१० जून २०१९ रोजी साजरा करण्यात आला. प्राध्यापक डॉक्टर सुधीर रसाळ, माजी मराठी विभाग प्रमुख, डॉक्टर बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, यांना व्याख्याते म्हणून आमंत्रित करण्यात आले होते. 'जागतिकीकरण आणि मराठी भाषा व्यवहार' हा त्यांच्या व्याख्यानाचा विषय होता.

पद्माकर शिरवाडकर, कार्याध्यक्ष यांनी प्रास्ताविक केले. तसेच त्यांच्या हस्ते डॉक्टर सुधीर रसाळ यांचा सत्कार करण्यात आला. डॉक्टर अनंत देशमुख, कार्यवाह यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला व आभार व्यक्त केले.

●

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा चाळकवाडी-जुन्नर

**१) दि. १८ ऑगस्ट २०१९ : मसाप शाखा चाळकवाडी-जुन्नरच्या वतीने निसर्ग सहल व शिवार कविसंमेलन संपन्न :**

या कविसंमेलनामध्ये तालुक्यांमधील एकूण ५० हून अधिक कवींनी सहभाग नोंदविला. नंदकुमार पाडेकर यांच्या अध्यक्षतेखाली हे कविसंमेलन पार पडले. यात शरयू चाळक, अदिती बालकवयित्री, दीपक सोनवणे, बासू सुरवसे, एकनाथ रावळ, फकिरा आतार, सुनील जगताप, जयवंत सोनवणे, सरिता पोटवडे, आनंद त्रिभुवन, महेंद्र चाळक, मंगल लेंडे, नवदीप आहेर आदी कवी-कवयित्रींनी सहभाग घेतला. कवी संदीप वाघोले यांनी सूत्रसंचालन केले.

या कार्यक्रमाचे प्रास्ताविक शाखा कार्याध्यक्ष शिवाजी चाळक यांनी केले व कार्यकारिणी सदस्य रवींद्र काशीद यांनी आभार मानले. बाळकृष्ण चाळक व बंधू यांच्यातर्फे स्नेहभोजनाचे आयोजन करण्यात आले होते.

●

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा दामाजीनगर (मंगळवेढा)

**१) दि. १९ मे २०१९ :** प्रसिद्ध लावणी नृत्यांगना मानूप्रिया सोलापूरकर यांनी शाखेस भेट दिली असता त्यांचा सत्कार सौ. दया वाकडे यांच्या हस्ते करण्यात आला. याप्रसंगी मानूप्रिया सोलापूरकर म्हणाल्या, ''नाद आणि लय यांनी शब्दांना अर्थ आणि माधुर्य प्राप्त होते. शब्दातील लावण्य साकारण्याचे सामर्थ्य कलेत असते म्हणूनच साहित्य आणि कला नेहमीच मानवी जीवन समृद्ध करतात.'' अध्यक्षस्थानी शाखाध्यक्ष प्रकाश जडे होते. सूत्रसंचालन बालाजी शिंदे यांनी केले.

**२) १३ जून २०१९ :** दुष्काळाच्या भूमीवर शाखेच्या मोरेवाडी-डोंगरगाव ता. मंगळवेढा येथील चारा छावणीत शेतकरी बांधवांसाठी कथाकथन, कविसंमेलन घेण्यात आले. अध्यक्षस्थानी प्रकाश जडे होते. याप्रसंगी सुषमा सुतार, रेश्मा गुंगे, यतिराज वाकळे, सुधा मंडर्व, कथाकथन, तर संगीता मासाळ, गोरक्ष जाधव यांचे काव्यवाचन झाले. लहू ढगे यांनी गीते सादर केली. याप्रसंगी बोलताना प्रा. दत्ता सरगर यांनी खेड्यांच्या भाव जीवनात दुभंगलेपण खेड्यांना भकास करीत असताना हा साहित्यिक उपक्रम भकास माळावर हिरवी स्वप्ने पेरणारा ठरेल, असे सांगितले.

**३) १९ जून २०१९ :** आंतरराष्ट्रीय ख्यातीचे गायक साईराम अय्यर यांच्या गाण्याचा कार्यक्रम शाखेच्या वतीने घेण्यात आला. अध्यक्षस्थानी माजी उच्च शिक्षणमंत्री प्रा. लक्ष्मणराव ढोबळे होते. आभार डॉ. प्रीती शिर्के यांनी मानले. नगराध्यक्षा सौ. अरुणा माळी यांची विशेष उपस्थिती होती.

**४) २६ जून २०१९ :** मराठी भाषेला अभिजात दर्जा मिळावा म्हणून मुख्यमंत्र्यांच्या नावे तहसीलदारांना शाखेच्या वतीने निवेदन देण्यात आले.

**५) ४ जुलै २०१९ :** महाकवी कालिदास दिन जि. प. सदस्या कवयित्री सौ. शैला गोडसे यांच्या अध्यक्षतेखाली साजरा करण्यात आला. या प्रसंगी बोलताना प्रमुख पाहुण्या सौ. अवंती पटवर्धन म्हणाल्या - कालिदासाचे साहित्य वाचणे म्हणजे साक्षात कालीमातेचे दर्शन घेणेच. वैश्विक दर्जाच्या कालिदासाच्या वाङ्मयात स्त्री पात्र पुरुषपात्रापेक्षा कणखर आहेत. सहसा कवितेत वापरला जाणारा उपमा अलंकार त्यांनी संपूर्ण नाटकात लीलया वापरला आहे. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन सौ. दया वाकडे यांनी केले, तर आभार सौ.रेश्मा गुंगे यांनी मानले. डॉ. किरण पडवळ व शैला गोडसे यांनी बहारदार कविता सादर केल्या. या वेळी शाखेच्या सभासदांच्या विविध परीक्षेत यशस्वी झालेल्या पाल्यांचा भेटवस्तू देऊन सत्कार करण्यात आला.

**६) दि. १३ जुलै २०१९ :** आषाढी एकादशीनिमित्त ह. भ. प. प्रा. विश्वनाथ ढेपे यांचे प्रवचन आयोजित करण्यात आले होते. अहंभाव त्यागून परस्पर सहानुभूतीने वागले, तर मानवी जीवन सुखी होते. विठ्ठलाच्या चरणाची धूळ पदराने पुसून ती कपाळी लावणाऱ्या जनाईच्या समर्पण भावनेचा अंगीकार केला पाहिजे, असे प्रा. ढेपे यांनी सांगितले. प्रास्ताविक ॲड. रमेश जोशी यांनी केले, तर आभार सौ. दया वाकडे यांनी मानले. अध्यक्षस्थानी प्रकाश जडे होते.

**७) दि. १६ जुलै २०१९ :** संत कान्होपात्रा पुण्यतिथी शाखेच्या कार्यालयात साजरी करण्यात आली. या वेळी बोलताना प्रा. दत्ता सरगर यांनी कान्होपात्रेच्या अभंगातील शरणागती, दुःख, व्याकूळता, तळमळ, उत्कटता, प्रासादिकता, परखडपणा हेच तिच्या साहित्याचे भूषण असल्याचे सांगितले. या वेळी सुषमा

सुतार व कल्याणी कोळी यांनीही आपले विचार मांडले. प्रास्ताविक अर्चना सलगर यांनी सूत्रसंचालन रेश्मा गुंगे, तर आभार प्रदर्शन अवंती पटवर्धन यांनी केले. अध्यक्षस्थानी नगराध्यक्षा सौ. अरुणा माळी होत्या.

**८) दि. १९ जुलै २०१९ :** भूमाता ब्रिगेडच्या तृप्ती देसाई यांनी शाखेस भेट दिली. तेव्हा समाजात स्त्रीला सन्मान मिळालाच पाहिजे, असे सांगून दामाजीनगर शाखेत बहुसंख्येने स्त्रियाच असल्याबद्दल आनंद व्यक्त केला.

**९) दि. १२ जुलै २०१९ :** प्रख्यात मराठी अभिनेते निळू फुले यांच्या प्रतिमेस स्मृतिदिनी कार्यकारी अभियंता धनंजय गोडसे यांचे हस्ते पुष्पहार घालून त्यांना आदरांजली वाहण्यात आली. अध्यक्षस्थानी प्रकाश जडे होते. प्रास्ताविक यतिराज वाकळे यांनी केले, तर आशपाक काझी यांनी आभार मानले.

**१०) दि. २१ जुलै २०१९ :** साहित्यरत्न लोकशाहीर अण्णाभाऊ साठे यांची पुण्यतिथी साजरी करण्यात आली. प्रमुख पाहुणे ॲड. नंदकुमार पवार होते. या वेळी प्रास्ताविक प्रकाश जडे यांनी केले, तर दया वाकडे यांनी सूत्रसंचालन केले. गोरक्ष जाधव यांनी आभार मानले.

**११) २३ जुलै २०१९ :** शाखेच्या सदस्या हसिना सुतार या मंगळवेढ्यातल्या मुस्लीम समाजातील पहिल्या महिला वकील झाल्याबद्दल त्यांचा ज्येष्ठ सदस्या रेखा जडे यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला.

**१२) दि. २८ जुलै २०१९ :** अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षा डॉ. अरुणा ढेरे यांचा सत्कार शाखेच्यावतीने सोलापूर येथे सौ. रेखा जडे यांच्या हस्ते करण्यात आला. या वेळी म.सा.प. पुणेचे कार्यवाह प्रकाश पायगुडे, कार्यकारिणी सदस्य पद्माकर कुलकर्णी, कल्याण शिंदे, शाखा अध्यक्ष प्रकाश जडे व महिला सदस्या मोठ्या संख्येने उपस्थित होते. या प्रसंगी बोलताना डॉ. अरुणा ढेरे म्हणाल्या, नवोदित महिला साहित्यिकांनी अभ्यासपूर्ण लेखन करावे. कविता जुनीनवी नसते, तर कविता ही कविताच असते! बालाजी शिंदे यांनी आभार मानले.

**१३) दि. ३ ऑगस्ट २०१९ :** मसाप शाखा दामाजीनगरच्या वतीने राज्यस्तरीय महिला साहित्य संमेलन मंगळवेढ्यातील श्रीराम मंगल कार्यालयात पार पडले. या परिसराचे कान्होपात्रा नगरी असे नामकरण करण्यात आले होते, तर व्यासपीठाचे निर्मळा साहित्यमंच असे नामकरण करण्यात आले होते.

संमेलनाचा प्रारंभ सकाळी ८ वाजता संत दामाजी मंदिरापासून ग्रंथ दिंडीने करण्यात आला. संत चोखामेळाच्या समाधीचे दर्शन घेऊन संमेलनाच्या कान्होपात्रा नगरीत तिचा समारोप झाला. दिंडीतील युवतींचे लेझीम पथक व बंजारा नृत्य दिंडीचे आकर्षण ठरले. या दिंडीत मंगळवेढ्याचे सर्व नगरसेवक, दामाजीनगर ग्रामपंचायतीचे सदस्य - विद्यार्थी - साहित्यप्रेमी नागरिक मोठ्या संख्येने सहभागी झाले होते. दिंडीचे उद्घाटन न. पा. मंगळवेढ्याच्या मुख्याधिकारी पल्लवी पाटील यांच्या हस्ते झाले. दिंडीत ज्येष्ठ साहित्यिका डॉ. सौ. इंदुमती जोंधळे, ज्येष्ठ ग्रामीण लेखक डॉ. द. ता. भोसले, म. सा.प. पुणे चे कार्यवाह प्रा. प्रकाश पायगुडे, खजिनदार सौ. सुनिताराजे पवार, कार्यकारिणी सदस्य पद्माकर कुलकर्णी, कल्याण शिंदे, दामाजीनगर शाखेचे अध्यक्ष प्रकाश जडे आदी मान्यवर उपस्थित होते. दिंडीतील महिलांची संख्या लक्षणीय होती.

●

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा पश्चिम मनोरमा सोलापूर

**१) दि. १५ एप्रिल २०१९ : जागतिक कला व सांस्कृतिक दिनानिमित्त हस्तकला व पाककला स्पर्धा :**

स्थळ : इंदिरा सभागृह, इंदिरा नगर, विजापूर रोड सोलापूर येथे स्पर्धा घेण्यात आली. या स्पर्धेत सर्व महिलांनी सहभाग घेतला. मसाप शाखा पश्चिम (मनोरमा) शाखा सोलापूरचे अध्यक्ष श्रीकांत मोरे, उपाध्यक्षा शोभा मोरे, कार्याध्यक्षा अस्मिता गायकवाड उपस्थित होते.

**२) दि. ३ मे २०१९ : जागतिक हास्य दिन साजरा :**

मसाप पश्चिम शाखा (मनोरमा) शाखा सोलापूर येथे जागतिक हास्य दिन साजरा करण्यात आला. आपण केलेल्या एखाद्या गोष्टीमुळे जेव्हा समोरच्याच्या चेहऱ्यावर हसू फुलते त्याचे समाधान वेगळेच असते. सर्वांनी हसा... हसायलाच पाहिजे असे मत श्रीकांत मोरे यांनी या दिनादिवशी सांगितले.

**३) दि. २९ जून २०१९ : अतिथी सत्कार व अतिथींचे जीवनानुभव :**

दूरदर्शन केंद्र वरळी, मुंबईचे साहाय्यक संचालक जयु भटकर यांचा मसाप पश्चिम शाखा (मनोरमा) सोलापूरच्या वतीने सत्कार मसाप पश्चिम (मनोरमा) सोलापूरचे अध्यक्ष श्रीकांत मोरे यांच्या हस्ते करण्यात आला. या वेळी उपाध्यक्षा शोभा मोरे व कार्याध्यक्षा अस्मिता गायकवाड तसेच कोषाध्यक्षा / सचिव शिल्पा कुलकर्णी व सर्व सभासद मंडळी उपस्थित होते. जयू भटकर यांनी त्यांच्या जीवनातील अनुभव सांगितले. अजय मोरे यांनी आभार व्यक्त केले.

**४) दि. ३१ जुलै २०१९ : कवी संमेलनाविषयी चर्चा :**

मसाप पश्चि सोलापूर (मनोरमा) शाखा सोलापूरच्या पदाधिकाऱ्यांची बैठक घेण्यात आली. या बैठकीमध्ये मसाप शाखा सोलापूर (मनोरमा) शाखा सोलापूरचे अध्यक्ष श्रीकांत मोरे, उपाध्यक्ष शोभा मोरे, कार्याध्यक्षा अस्मिता गायकवाड, कोषाध्यक्षा / सचिव शिल्पा कुलकर्णी तसेच कार्यकारिणी सदस्य प्रा. माधव कुलकर्णी, राजेंद्र भोसले, प्रशांत पाटील, निलकंठ करंडे, पुरुषोत्तम साखरे, अजय मोरे, सहसचिव सुनिल पाटील आणि सर्व सभासद मंडळी उपस्थित होते.

**५) कथाकथन कार्यक्रमाचे उद्घाटन :** सोलापूर येथील अस्मिता व्हिजन टि.व्ही. चॅनेल येथे दर शनिवारी सुरू असलेला गंध मातीचा

या कार्यक्रमांतर्गत महिन्यातील दुसऱ्या व चौथ्या शनिवारी कथाकथन हा कार्यक्रम घेण्यात येत आहे. या कार्यक्रमाचे उद्घाटन मसाप पश्चिम सोलापूर (मनोरमा) शाखेचे अध्यक्ष श्रीकांत मोरे व उपाध्यक्ष सौ. शोभा मोरे तसेच अस्मिता व्हिजन टि.व्ही. चॅनेलच्या संपादिका सौ. अस्मिता गायकवाड आणि कवी, कथा लेखिका श्रुतीश्री वडगवाळकर यांच्या हस्ते करण्यात आले. आभार अजय मोरे यांनी मानले.

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा शाहूपुरी

**१) दि. २४ /४/२०१८ : शाखा वर्धापन दिन :** 'उदाहरणार्थ नेमाडे' हा भालचंद्र नेमाडे यांच्यावर माहितीपट दाखवण्यात आला. अध्यक्ष : किशोर बेडकिहाळ, प्रमुख पाहुणे : शिरीष चिटणीस, सूत्रसंचालन : नंदकुमार सावंत, आभार अमर वेंद्रे.

**२) दि. १० जून २०१८ : पर्यावरण दिन :** 'वनस्पतींच्या अभियांत्रिकी करामती' या विषयावर प्रा. श्री. द. महाजन यांचे व्याख्यान. अध्यक्ष : विनोद कुलकर्णी, प्रमुख पाहुणे : प्रा. श्री. द. महाजन, सूत्रसंचालन : अजित साळुंखे, आभार : डॉ. उमेश करंबेळकर.

**३) दि. २० ऑगस्ट २०१८ : कवि वि. दा. करंदीकर यांच्या कवितांच्या अभिवाचनाचा कार्यक्रम 'स्वच्छंद :**

प्रमुख पाहुणे : आचरेकर प्रतिष्ठान कणकवली, सूत्रसंचालन : नंदकुमार सावंत, आभार : अॅड. चंद्रकांत वेवले.

**४) दि. ४ ऑक्टोबर : २०१८ : प्रकट मुलाखत : कवी संदीप खरे यांची मुलाखत :**

अध्यक्ष : विनोद कुलकर्णी, प्रमुख पाहुणे : संदीप खरे, सूत्रसंचालन : अॅड. चंद्रकांत वेवले, आभार : किशोर बेडकिहाळ.

**५) दि. १० फेब्रुवारी २०१९ :** बालकुमार साहित्य संमेलन हत्तीखाना शाळा व मसाप शाहुपुरी शाखा संयुक्त विद्यमाने :

अध्यक्ष : मिलिंद जोशी, प्रमुख पाहुणे : वर्षा तोडमल, विनोद कुलकर्णी, सूत्रसंचालन : अजित साळुंखे, आभार : नंदकुमार सावंत.

**६) दि. २७ फेब्रुवारी २०१९ : मराठी भाषा पंधरवडा :**

उद्घाटन कार्यक्रम : २७ फेब्रुवारी २०१९, उद्घाटक : डॉ. विवेक सावंत (एमकेसीएल कंपनीचे कार्यकारी संचालक), व्याख्यान : मराठी भाषा आणि तंत्रज्ञान.

**७) दि. २ मार्च २०१९ :** वंदना बोकील-कुलकर्णी यांचा रारंग ढांग या प्रभाकर पेंढारकर यांच्या कादंबरीवर आधारित ध्वनिफीत व सादरीकरण.

**८) ९ मार्च २०१९ :** पुलंच्या जन्मशताब्दी निमित्त पुलंचा वटवा सादरकर्ते अभय देवरे व वनराज कुमकर.

**९) १४ मार्च २०१९ :** पु.शि. रेगे यांच्या कादंबरीवर आधारित 'सावित्री' एकपात्री प्रयोग, सादरकर्त्या अभिनेत्री प्रिया जामकर.

**१०) १७ मार्च २०१९ :** गदिमांच्या जन्मशताब्दीनिमित्त सुप्रसिद्ध कवी राजन लाखे यांचे व्याख्यान, विषय : गदिमा एक आठवण एक साठवण.

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा सावेडी उपनगर

**१) दि. १० ऑगस्ट २०१९ :**

मसाप सावेडी उपनगर शाखेच्या वतीने व शांतीकुमारजी फिरोदिया मेमोरियल फाऊंडेशनच्या सहकार्याने आज निरीक्षण गृह व बालगृह (रिमांड होम) व बावा वाडी या शाळेतील विद्यार्थ्यांना मराठी भाषेची गोडी वाढावी याकरिता विविध विषयांच्या पुस्तकांची भेट फिरोदिया यांच्या हस्ते देण्यात आली. त्या वेळी ते बोलत होते. कार्यक्रमास ज्येष्ठ साहित्यिक सर्वश्री चंद्रकांत पालवे, चित्रकार श्रीधर अंभोरे, सदानंद भणगे, रिमांड होमचे विश्वस्त गौरव मिरिकर यांची प्रमुख उपस्थिती होती.

या वेळी नामवंत चित्रकार श्रीधर अंभोरे यांनी शिक्षक व विद्यार्थ्यांवरोबर चित्रकलेविषयी संवाद साधला. गौरव मिरीकर यांनी स्वागत केले. या वेळी परिषदेचे पदाधिकारी सर्वश्री नंदकिशोर आढाव, स्नेहल उपाध्ये, दीपाली देऊतकर, बालगृहाचे अधीक्षक महेश ढेरे, अधीक्षिका पौर्णिमा माने, मुख्याध्यापक शशिकांत वाघुलकर, अमित झिरपे, सर्व शिक्षकवृंद उपस्थित होते.

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा जुळे सोलापूर

**१) दि. ३ मार्च २०१९ :** महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा जुळे सोलापूरने, कै. ग. दि. माडगूळकर, कै. पु. ल. देशपांडे, कै. सुधीर फडके यांच्या जन्मशताब्दीचे औचित्य साधून शालेय विद्यार्थ्यांसाठी सुगम संगीत स्पर्धा रविवार ३ मार्च २०१९ रोजी आयोजित केलेली होती. त्यात ७० मुले सहभागी झाली होती. त्या स्पर्धेचे पारितोषिक वितरण आणि मराठी राजभाषा दिनानिमित्त ज्येष्ठ पत्रकार अरविंद जोशींचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. अध्यक्षस्थानी मसाप जुळे सोलापूरच्या कार्याध्यक्षा सायली जोशी होत्या. सदर कार्यक्रमाचे सूत्रसंचालन मसाप जुळे सोलापूरचे प्रसिद्धी प्रमुख श्रीकांत कुलकर्णी यांनी केले, तर आभार प्रमुख कार्यवाह गिरीश दुनाखे यांनी मानले. या वेळी विद्यार्थी, पालक, मसाप जुळे सोलापूर कार्यकारिणी सदस्य, तसेच साहित्य रसिकांची



अनुक्रमणिका

उपस्थिती बहुसंख्येने होती.

२) दि. ८ मार्च २०१९ : महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा जुळे सोलापूर आणि संतोषी महिला मंडळ, शिवगंगानगर, जुळे सोलापूर संयुक्त विद्यमाने, आंतरराष्ट्रीय महिलादिनाचे औचित्य साधून महिलांसाठी विविध गुणदर्शनाचा कार्यक्रम शुक्रवार ८ मार्च २०१९ रोजी जुळे सोलापूरातील शिवगंगामंदिर हॉलमध्ये आयोजित करण्यात आला होता. या वेळी महिलांनी एकपात्री प्रयोग, नाच, गाणी, अनुभव कथन केले. या कार्यक्रमाचे अध्यक्षस्थानी मसाप जुळे सोलापूरच्या कार्याध्यक्षा सायली जोशी होत्या. सदरचा कार्यक्रम मसाप जुळे सोलापूर अध्यक्ष पद्माकर कुलकर्णी आणि कवयित्री वसुंधरा शर्मा यांच्या प्रमुख उपस्थितीत पार पडला. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन रोहिणी कुलकर्णी यांनी केले, तर आभार प्रदर्शन मसाप जुळे सोलापूरच्या ज्येष्ठ कार्यकारिणी सदस्य सौ. शांताबाई क्षीरसागर यांनी केले. या कार्यक्रमाला प्रमुख कार्यवाह गिरीश दुनाखे, कोषाध्यक्ष जयंत रायते यांच्या विशेष उपस्थितीसह सर्व कार्यकारिणी सदस्य, साहित्यरसिक, संतोषी महिला मंडळ' सदस्या यांची उपस्थिती होती.

३) दि. १७ मार्च २०१९ : महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा जुळे सोलापूर आयोजित 'स्व. श्रीनिवास विष्णू रायते गुरुजी राज्यस्तरीय बालसाहित्यिक पुरस्कार २०१९' यंदा ज्येष्ठ लेखिका आश्लेषा महाजन यांना मसाप पुणेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते आणि आकाशवाणी सोलापूरचे साहाय्यक संचालक सुनिल शिनखेडे यांच्या अध्यक्षतेखाली प्रदान करण्यात आला. प्रास्ताविक मसाप जुळे सोलापूरचे अध्यक्ष पद्माकर कुलकर्णी यांनी केले. मानपत्राचे वाचन प्रमुख कार्यवाह गिरीश दुनाखे यांनी, सूत्रसंचालन प्रा. सौ. स्वानंदी देशपांडे यांनी, तर आभार प्रदर्शन कार्यवाह संदीप कुलकर्णी यांनी केले. मधुसूदन रायते (हस्ताक्षर तज्ज्ञ) यांनी स्वागत केले. या वेळी डॉ. वासुदेव, सौ. माधवी रायते परिवारासह, कार्यकारिणी सदस्य, साहित्यरसिक बहुसंख्येने हजर होते. सदर कार्यक्रमात अमित कामतकर, कवी रामचंद्र धर्मसाले आणि मसाप पुणेचे सोलापूर जिल्हा प्रतिनिधी कल्याणराव शिंदे यांची विभागीय साहित्य संमेलन निमंत्रकपदी निवड झाल्याबद्दल मान्यवरांच्या हस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला. कार्यक्रमाचे शेवटी गोव्याचे मुख्यमंत्री मनोहर पर्रिकर यांना भावपूर्ण श्रद्धांजली वाहण्यात आली.

४) दि. २४ जून २०१९ : 'मराठीच्या भल्यासाठी' या दि. २४ जून २०१९ रोजी मुंबईच्या आझाद मैदानावर धरणे आंदोलनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. लेखक, प्रकाशक, साहित्य संस्था कार्यकर्ते या आंदोलनात सहभागी झाले होते. या आंदोलनाला महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर यांनी जाहीर पाठिंबा देऊन त्या आंदोलनात, सदस्य रामचंद्र धर्मसाले यांना सहभागी प्रतिनिधी म्हणून पाठवले. त्याच वेळी सोलापुरात अध्यक्ष पद्माकर कुलकर्णी आणि कार्याध्यक्षा सायली जोशी यांच्या नेतृत्वाखाली नामदार विजयकुमार देशमुख आणि सहकार मंत्री नामदार सुभाषबापू देशमुख तसेच सोलापूरचे नूतन खासदार डॉ. जयसिद्धेश्वर शिवाचार्य यांना याबद्दलची निवेदने देण्यात आली. या वेळी प्रमुख कार्यवाह गिरीश दुनाखे, कोषाध्यक्ष जयंत रायते, उपाध्यक्ष प्रशांत जोशींसह कार्यकारिणी सदस्य समक्ष उपस्थित होते.

५) दि. २८ जुलै २०१९ : महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा जुळे सोलापूर व प्रिसिजन फाउंडेशन सोलापूर संयुक्त विद्यमाने आयोजित 'स्व. दत्ता हलसगीकर ज्येष्ठ साहित्यिक पुरस्कार २०१९' यंदा ज्येष्ठ कवयित्री, लेखिका, साहित्यिक आणि अ. भा. मराठी साहितय संमेलनाच्या विद्यमान अध्यक्ष डॉ. अरुणा ढेरे यांना संत साहित्याचे अभ्यासक आणि मसाप पुणेचे कार्यकारी विश्वस्त उल्हासदादा पवार यांच्या शुभहस्ते मसाप पुणेचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांच्या अध्यक्षतेखाली समारंभपूर्वक प्रदान करण्यात आला. या पुरस्कार वितरणापूर्वी स्व. दत्ता हलसगीकर आणि डॉ. अरुणा ढेरे यांच्या निवडक कवितांचे वाचन करण्यात आले. याच कार्यक्रमात रवि हलसगीकर यांनी आपल्या वडिलांचे स्मरणार्थ तयार केलेल्या 'स्व. दत्ता हलसगीकर यांच्या साहित्याचा समावेश' असलेल्या ब्लॉगचे उद्घाटन डॉ. अरुणा ढेरे यांच्या शुभहस्ते झाले. तसेच. त्याच कार्यक्रमात महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा जुळे सोलापूर यांनी घेतलेल्या 'राज्यस्तरीय दिवाळी अंक स्पर्धा २०१८'च्या स्पर्धेतील विजेत्यांना पारितोषिक प्रदान करण्यात आले. संपूर्ण कार्यक्रमाचे सूत्रसंचालन प्रा. सौ. दीपाली जोशी आणि प्रा. सौ. स्वानंदी देशपांडे यांनी, तर प्रास्ताविक अध्यक्ष पद्माकर कुलकर्णी यांनी, तर माधव देशपांडे यांनी प्रिसिजन फाउंडेशनबद्दल माहिती दिली. आभार प्रदर्शन प्रमुख कार्यवाह गिरीश दुनाखे यांनी केले.

●

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा उत्तर सोलापूर

१) दि. १९ फेब्रुवारी २०१९ : महाराष्ट्र शिक्षण प्रसारक मंडळ, संचलित, तुळशीदास नगर, बाळे येथे महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उत्तर सोलापूर, ज. रा. चंडक प्रशाला व इंदिरा प्रशाला, बाळे यांच्या संयुक्त विद्यमाने शिव व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. गायत्री गायकवाड, ओंकार गायकवाड, गायत्री साखरे, प्रणाली पुजारी आदी विद्यार्थ्यांनी छत्रपती शिवाजी महाराजांच्या विविध पैलूंचे विचार मनोगतातून व्यक्त केले.

प्रा. नागेश कोकरे यांनी आपल्या व्याख्यानात म्हणाले, स्वराज्याची शपथ घेत असताना महाराज हे एकटेच होते. पण आज जगात प्रजा सुखाची व आनंदाची शिदोरी दिली.

व्यासपीठावर प्रशालेचे मुख्याध्यापक मधुकर मुळे अध्यक्षस्थानी होते. इंदिरा प्रशालेच्या मुख्याध्यापिका तेजस्विनी चराटे, पर्यवेक्षक उदय जाधव, शोभा कुंटेलू, संभाजी मोरे, म.सा.परिषद कार्यकारिणी सदस्य उपस्थित होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन मसापचे कार्याध्यक्ष निवृत्ती दळवी यांनी केले, तर आभार उमेश वाघमारे यांनी मानले.

**२) दि. ८ मार्च २०१९ : जागतिक महिला दिन साजरा :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उ. सोलापूर यांच्या वतीने जागतिक महिला दिन मोठ्या उत्साहात ज. रा. चंडक प्रशालेच्या प्रांगणात साजरा करण्यात आला.

कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी इंदिरा प्रशालेच्या मुख्याध्यापिका सौ. तेजस्विनी चराटे होत्या. प्रारंभी प्रमुख पाहुणे डॉ. मिनाक्षी कासेगावकंर, मुख्याध्यापक मधुकर मुळे, मुख्याध्यापिका तेजस्विनी चराटे, तुळशीदास जाधव आदी मान्यवरांच्या हस्ते क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले, राजमाता जिजाऊ यांच्या प्रतिमांचे पूजन करण्यात आले.

या प्रसंगी म.सा.प.चे कार्याध्यक्ष दळवी एन. डी., कार्यवाह आवताडे व विविध पदाधिकारी, पर्यवेक्षक उदय जाधव उपस्थित होते.

**३) दि. २२ मार्च २०१९ : तुकाराम बीजनिमित्त प्रवचन :**

ह.भ.प. प्रा. गोपाळ लोंढे यांचे प्रवचन (व्याख्यान) आयोजित केले होते. प्रारंभी तुकाराम महाराज यांच्या मूर्तीस प्रशालेचे मुख्याध्यापक मधुकर मुळे, पर्यवेक्षक उदय जाधव व प्रमुख पाहुणे व कार्यकारिणी सदस्य यांच्या हस्ते पुष्पहार घालण्यात आले.

सदर कार्यक्रमाचे प्रास्ताविक नितीन आवताडे (कार्यवाह) व सूत्रसंचालन निवृत्ती दळवी (कार्याध्यक्ष) व आभार शहाजी भोसले यांनी मानले.

**४) दि. २३ एप्रिल २०१९ :** महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे शाखेच्या उपाध्यक्षा, माजी आमदार निर्मलाताई ठोकळ यांच्या ८१व्या वाढदिवसानिमित्त म.सा.प. पुणे शाखा उत्तर सोलापूरच्यावतीने वाढदिवस साजरा करण्यात आला. येथील वृद्धाश्रमातील सुमारे शंभर व्यक्तींना अन्नदानाचे वाटप करण्यात आले.

दिनांक २४ एप्रिल २०१९ रोजी सकाळी ठीक १० वाजता तोरणा निवासस्थानी महाराष्ट्र साहित्य परिषद उत्तर शाखेचे अध्यक्ष ह.भ.प.सुधाकर महाराज इंगळे, कार्याध्यक्ष निवृत्ती दळवी, पद्माकर कुलकर्णी, कार्यवाह नितीन आवताडे, उदय जाधव व ज्योतीराम चांगभले, मधुकर मुळे, वसंतराव देशमुख, मुजावर सर, संतोष काळुके, सुरेश सदरे, मुकुंद मोरे, कुंभार सर व ज. रा. चंडक प्रशाला सेवक सह. पतसंस्थेचे सहसंचालक या प्रसंगी उपस्थित होते.

**५) दि. २ मे २०१९ : कलावती भोसले यांचा स्वातंत्र्य चळवळीत सहभाग शोकसभेत मान्यवरांची श्रद्धांजली :**

या शोकसभेत निर्मला ठोकळ, माजी कुलगुरू डॉ. इरेश स्वामी, पद्माकर कुलकर्णी, अॅड. सुरेश गायकवाड, डॉ. नसिमा पठाण, डॉ. आनंद जाधव, विनायक गरड, रूस्तुम कंपली, गोविंदराव पंखे, आशा ठोकळ, उदय जाधव, आशा भोसले, नितीन आवताडे, रामचंद्र कुलकर्णी, निवृत्ती दळवी आदींनी स्व. कलावती भोसले यांच्यावद्दल भावना व्यक्त करून श्रद्धांजली वाहिली.

या शोकसभेस माजी खासदार धर्मण्णा साधुल, सिद्धेश्वर साखर कारखान्याचे अध्यक्ष धर्मराज काडादी, दत्ता गाढवे, माजी महापौर मनोहर सपाटे, अॅड. सुभाष साळुंखे, सुधीर खरटमल, अॅड. जयदीप माने, भिकाजी गाजरे, दत्ता गाजरे, हरिहर मोरे, मधुकर मुळे, शिवाजी आतकरे, सुनील चांगभले, कुंटेलू सर तसेच महाराष्ट्र शिक्षण प्रसारक मंडळ, बाळे येथील विविध शाखांचे मुख्याध्यापक, शिक्षकवृंद व महाराष्ट्र साहित्य परिषद उत्तर शाखेचे विविध पदाधिकारी व सदस्य व स्वातंत्र्यप्रेमी उपस्थित होते.

सदर कार्यक्रमाचे सूत्रसंचालन साळुंखे मॅडम यांनी केले.

**६ ) दि. १६ जुलै २०१९ : महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शाखा उत्तर सोलापूर व ज. रा. चंडक प्रशाला यांच्या संयुक्त विद्यमाने गुरुपौर्णिमा-व्याख्यान :**

सदर कार्यक्रमासाठी संस्थेच्या अध्यक्षा निर्मलाताई ठोकळ व महाराष्ट्र साहित्य परिषद उ. सोलापूर शाखेचे अध्यक्ष ह.भ.प. सुधाकर महाराज इंगळे व विविध पदाधिकारी उपस्थित होते.

तर सदर कार्यक्रमासाठी प्रमुख पाहुणे म्हणून ह.भ.प. मोपरे महाराज यांनी आपले मनोगत व्यक्त केले.

सदर कार्यक्रमाचे सूत्रसंचालन म.सा.प. कार्याध्यक्ष दळवी एन.डी. यांनी केले, तर आभार प्रदर्शन नितीन आवताडे यांनी केले.

**७) दि. १३ ऑगस्ट २०१९ : 'शिंपल्यातील मोती' ललित लेख संग्रह प्रकाशन सोहळा :**

सदर कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी डॉ. इरेश स्वामी (माजी कुलगुरू सोलापूर विद्यापीठ, सोलापूर) हे होते. 'शिंपल्यातील मोती' या पुस्तकाच्या लेखिका महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे उपाध्यक्षा श्रीमती निर्मलाताई ठोकळ तसेच प्रमुख पाहुणे म्हणून डॉ. प्रा. राजशेखर शिंदे (मराठी विभाग प्रमुख) दयानंद कॉलेज, सोलापूर व डॉ. अशोक गायकवाड (वालचंद कॉलेज, सोलापूर), राजश्री राजेंद्र भोसले प्रकाशक - शिव प्रज्ञा प्रकाशन, सोलापूर तसेच महाराष्ट्र शिक्षण प्रसारक मंडळ, बाळेचे उपाध्यक्ष सचिन ठोकळ, कोषाध्यक्षा शिल्पा ठोकळ, महाराष्ट्र साहित्य परिषद, उत्तर शाखेचे अध्यक्ष व विविध पदाधिकारी तसेच इंदिरा ज्ञान वर्धिनी संस्थेचे विविध पदाधिकारी व महाराष्ट्र शिक्षण प्रसारक मंडळ, बाळेच्या विविध शाखांतील मुख्याध्यापक, शिक्षकवृंद व अनेक मान्यवर व प्रेक्षक उपस्थित होते.

सदर कार्यक्रमाचे सूत्रसंचालन मसाप उत्तर शाखेचे कार्याध्यक्ष निवृत्ती दळवी यांनी केले, तर आभार कार्यवाह नितीन आवताडे यांनी केले.

●

## महाराष्ट्र साहित्य परिषद : शाखा सिन्नर

**१) दि. २५ ऑगस्ट २०१९ : 'पाऊसधारा काव्यमैफिल':**

अध्यक्ष : प्रा. राजाराम मुंगसे, प्रमुख उपस्थिती : रवींद्र कांगणे, मनीषा उगले, जावेद शेख, मंगल सांगळे, शामसुंदर झळके, रोहिणी मिठे, स्वप्नील डुंबरे, नितेश दातीर,

सूत्रसंचालन : मनीषा उगले, मंगल सांगळे, आभार : रवींद्र कांगणे.










महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने परिषदेचे प्रेरणास्थान लोकमान्य टिळक यांच्या स्मृती शताब्दी वर्षाच्या पूर्वसंध्येला 'टिळक युग' या विषयावर माजी संमेलनाध्यक्ष डॉ. सदानंद मोरे यांचे व्याख्यान झाले. या वेळी प्रमुख पाहुणे टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे कुलपती डॉ. दीपक टिळक यांनी परिषदेला लोकमान्यांचा पुतळा भेट दिला.

महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, संवाद पुणे आणि स्वामी विवेकानंद शिक्षण प्रसारक मंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने लोकशाहीर अण्णाभाऊ साठे यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने आयोजित लोकशाहीर अण्णाभाऊ साठे यांनी महाराष्ट्रासाठी दिलेले योगदान' या परिसंवादात प्रा. मिलिंद जोशी यांनी डॉ. बजरंग कोरडे, डॉ. माधवी खरात, डॉ. प्रकाश खांडगे, वि. दा. पिंगळे यांच्याशी संवाद साधला.



मराठी भाषा शिक्षणाचा कायदा सक्तीचा करण्यात यावा यासाठी मुंबईला चोवीस संस्थांनी एकत्र येऊन २४ जून २०१९ रोजी आझाद मैदानावर धरणे आंदोलन केले. या आंदोलनात महाराष्ट्र साहित्य परिषदेचा लक्षणीय सहभाग होता.



Maharashtra Sahitya Patrika, Quarterly : September 2019
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57
Book Pkt. Periodical Category. Publishing Date : 30 September 2019



पु.ज जोशी चारुशीला सुनील
८३. २९/८, बी-१, 'अथर्ववेद',
कोथरूड,
पुणे - ४११ ०२९

BP 411030 30.09.2019
2567 2325369
बुक-पोस्ट
भारत INDIA POSTAGE ₹2.00
P140747

प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३